सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ६० वें

# हिरे आणि हिरकण्या

महाकवि खलील जिब्रान



अनुवादक
श्रीपाद जोशी



र्मार्च, १९५३ ] [ मूल्य १॥ रुपया

# जिब्रानचें सौंदर्य-दर्शन

'जीवनदर्शना'ची प्रस्तावना लिहिली त्या वेळीं The Earth Gods हें जिब्रानचें पुस्तक मला पाहावयास मिळालें नव्हतें. पुढें युद्धामुळें त्याची पुस्तकें मिळणें अशक्य झालें. अशा स्थितींत सैयद बशीर हिन्दी यांचा 'अरज़ी देवता' (भूदेव) हा उर्दू अनुवाद दिल्लीला कांहीं वर्षांपूर्वीं माझ्या नजरेस पडला त्या वेळीं मला फारच आनंद झाला. तो वाचतांना आणखीहि कित्येक सुन्दर सुन्दर गद्यकाव्यें त्यांत संग्रहित केलेलीं आढळलीं. त्यांचा मराठी अनुवाद करण्याची तयारी श्रीपाद जोशी यांनीं दर्शविल्यामुळें मीं त्यांना आवडीनें प्रोत्साहन दिलें. हीं बहुतेक अनुवादित गद्यकाव्यें मुंबईच्या 'मौजू' साप्ताहिकांतून वेळोवेळीं प्रकाशित झालीं आहेत. हा अनुवाद झाल्यावर जिब्रानचे इंग्रजी ग्रंथ पुन्हां बाजारांत आल्यामुळें पाहाण्यास मिळाले. त्यांत Prose Poems नांवाच्या संग्रहांत यांतील बहुतेक गद्यकाव्यें समाविष्ट केलेलीं आढळलीं. हें सर्व लिखाण जिब्राननें आपल्या तरुण वयांत अरबी भाषेंत लिहिलेलें आहे. उर्दू अनुवाद मूळ अरबीवरून केला असल्याचें सांगतात. मराठी अनुवाद मीं इंग्रजी अनुवादाशीं ताडून पाहिला आहे. Prose Poems मध्यें असलेलीं बारा गद्यकाव्यें प्रस्तुत संग्रहांत आलीं आहेत. 'हे माझ्या मातेच्या बालकांनो!', 'तूं माझा भाऊ आहेस आणि मी तुझ्यावर प्रेम करतों,' 'तूं आणि मी' आणि 'मानवाचें गाणें' हीं चार गद्यकाव्यें अद्यापि इंग्रजींत आलेलीं दिसत

नाहींत. तीं चांगलीं वाटल्यामुळें उर्दूतून अनुवादून या संग्रहांत दाखल केलीं आहेत.

खलील जिब्रान हा एक थोर कलावंत आहे. त्यानें चित्रकला आणि ललित साहित्य यांची आपल्या आयुष्यांत अखंड समांतर उपासना चालविली होती. या दोन्ही कला-प्रकारांतून त्यानें आपल्याला प्रतीत झालेलें जीवनदर्शन व्यक्त केलें आहे. कलावंतांचे देखील पुष्कळ प्रकार आढळतात. कलावंतांच्या अनुभूतींत कित्येक वेळां क्रांतिकारक बदल झाल्यामुळें त्यांच्या जीवननिष्ठेंतहि बदल घडून येतो. हा बदल त्यांच्या कलेंतहि व्यक्त झालेला आढळतो. यामुळें अशा कलावंतांच्या कलाकृतींत विरोध वा विसंवाद दिसून येतो. अथवा एका काळच्या जीवननिष्ठा आजिबात नष्ट झाल्यामुळें कांहींचें कला-जीवनहि विराम पावतें. पण कांहीं कलावंत असे आढळून येतात कीं, ज्यांच्या कला-जीवनांत विसंवाद अथवा विरोध मुळींच आढळत नाहीं. त्यांचें जीवनदर्शन कधीं खंडित होत नाहीं; तें अधिकाधिक रमणीय आणि परिणामकारक बनत जातें. खलील जिब्रान हा अखंडदर्शी कलावंत आहे. त्याच्या प्रारंभींच्या कलाकृतींत जीवनाचें जें दर्शन परिस्फुटित झालेलें आहे तेंच अखेरपर्यंत स्फुरत राहिलेलें आढळतें. त्याच्या प्रतिभेचा विकास झाला नाहीं असें नाहीं. त्याच्या कलेला अधिकाधिक परिणत स्वरूप प्राप्त झालेलें कोणालाहि प्रतीत होईल. पण या त्याच्या विकासांत विरोध अथवा विसवाद दाखवितां येणार नाहीं. प्रतिभेच्या बळावर त्याला प्रथमच जें जीवनरहस्य आकळितां आलें त्याची गंभीरता आणि व्यापकता उत्तरोत्तर वाढत गेली. त्याचा

आत्मविश्वासहि अधिकाधिक वाढत गेला. पण त्याच्या एकंदर कलाजीवनांत निश्चित असें एकच जीवनदर्शन भरून राहिलेलें आहे. याचें कारण खलील जिब्रान हा जीवनाच्या आध्यात्मिक साक्षात्कारावर पोसलेला एक कलावंत होता, हेंच होय.

आध्यात्मिक जीवनदृष्टि आणि रूढ धार्मिकता या दोहों-मध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. रूढ धर्म मनुष्याचा अहंकार वाढवितात, त्याच्या भावनांना संकुचित बनवितात आणि त्याच्या बुद्धीला भेद पाडावयास शिकवितात. कलावंताची प्रतिभा जेव्हां रूढ धर्मांचा उच्छेद करून विश्वाला गवसणी घालण्याइतकी विशाल बनते त्या वेळीं तिला विश्वजीवनाच्या अनंतत्वाची साक्षात् प्रतीति येते. हेंच जीवनाचें आध्यात्मिक दर्शन होय. अशी थोर प्रतिभा ज्या कलावंताच्या वांट्याला आली असेल तो जीवनाचीं सारीं रहस्यें अगदीं बालपणीं देखील आकलन करूं शकतो. खलील जिब्रानला अशी प्रतिभा बालपणींच लाभलेली दिसते. ही प्रतिभाशक्ति तार्किक बुद्धीहून भिन्न आहे. केवळ तार्किक बुद्धीला जीवनाचें आध्यात्मिक दर्शन वैज्ञानिक सत्य म्हणून मान्य होत नाहीं. या आध्यात्मिक दर्शनाला कल्पनाजाल अथवा भ्रम म्हणून तिरस्कारानें उडवून लावण्यांत तार्किक बुद्धीला भूषण वाटत असतें. परंतु प्रतिभा-शक्ति ही देखील जीवनांतील एक सत्यशक्ति आहे. मानवी जीवनाचे बाह्य व्यापार बाह्य सृष्टीशीं निगडित असल्यामुळें त्यांच्या यशस्वितेसाठीं भौतिक विज्ञानाची गरज निःसंशय आहे; पण मानवी जीवनाचें अंतःस्वरूप केवळ भौतिकशास्त्रानें संपूर्णपणें उलगडणार नाहीं. हें स्वरूप अंतःशक्तीनेंच अखेर जाणतां येईल. महाकवीची प्रतिभा म्हणजे मानवी मनाची ही

गूढ अंतःशक्तिच होय. या अंतःशक्तीचा भौतिक शक्तीशीं विरोध मानण्याचें कारण नाहीं. आत्मिक आणि भौतिक असा जीवनाविरोध कल्पून, नानाविध विचारसंप्रदाय आतां-पर्यंत माणसानें रूढविले आहेत. पण सारें जीवन हें तत्त्वतः एकच समजलें पाहिजे; आणि भौतिक विश्व हा आत्मिक शक्तीचा विकास अथवा विलास मानला पाहिजे. अंतःस्वरूपांत लपलेली एकता बाह्य स्वरूपांतील विविधतेंतहि अखेर प्रत्ययाला यावयाची आहे. जीवनाच्या अंतःस्वरूपांतच जीवनाचीं सारीं मूल्यें बीजरूपानें वसत असतात. या मूल्यांचा साक्षात्कार कलावंतांना त्यांच्या प्रतिभाशक्तीनें होतो. या मूल्यांची सामाजिक व्यवहारांत प्रस्थापना करण्याचें काम भौतिक विज्ञानाचें आहे. त्या विज्ञानाला प्रेरक आणि प्रोत्साहक शक्ती कवीची प्रतिभा होऊं शकते. प्रतिभा आणि विज्ञान यांचा परस्परसंबंध नीट जाणला असतां कलावंतांचें जीवनविकासांत कोणतें कार्य असतें तें स्पष्ट दिसून येईल. खलील जिब्राननें आपल्या थोर प्रतिभेनें अरबी भाषा बोलणाऱ्या महान् लोक-समूहाला अलीकडच्या काळांत सामाजिक विकासाची थोर प्रेरणा दिलेली आहे.

खलील जिब्रान याची भूमिका प्रारंभापासून अखेरपर्यंत सौंदर्योपासक कलावंताचीच होती. प्रत्यक्ष राजकीय उलाढालींत तो कधींच पडला नाहीं. त्याच्या कलेसाठींच त्याला त्याच्या चर्चनें बहिष्कृत केलें होतें. त्याच्या कलेसाठींच तुर्की साम्राज्य-सत्तेनें त्याला मायदेशांतून हद्दपार केलें होतें. तो सौंदर्यदर्शी कलावंत होता हें खरें; पण त्याच्या सौंदर्याची कल्पना मोहकतेला भेदून जीवनाच्या सत्स्वरूपापर्यंत पोहोंचलेली आहे. तो म्हणतो,

" माझ्या अंतरात्म्यानें मला सावध केलें आणि मला अशी शिकवण दिली कीं, ' रूप आणि रंग यांच्या पडद्याआड दडलेलें सौंदर्य तूं शोधून काढ. '

" होय, माझ्या अंतरात्म्यानें मला अगदीं बजावून सांगितलें कीं, ' जी जी वस्तु कुरूप व असुंदर समजली जाते ती ती सुस्वरूप व सुंदर दिसूं लागेपर्यंत तूं तिच्याकडे टक लावून पाहा. '

" जोंपर्यंत माझ्या अंतरात्म्यानें मला अशी शिकवण व प्रेरणा दिली नव्हती तोंपर्यंत मला सौंदर्य हें धुरांच्या लोटां-मधून थरथरणाऱ्या दीपशिखेप्रमाणें भासत होतें. परंतु आतां धूर नाहींसा झाला आहे आणि मला ज्योतीशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. "

मोहाचें आवरण गळून पडल्यामुळें सामान्य माणसाला आसक्त करणाऱ्या गोष्टींकडे जिब्रानचें हृदय ओढलें जात नाहीं. लौकिक दृष्टीनें आपण पागल ठरलों असल्याचें तो ठिकठिकाणीं सांगतो.

" मी या जगांत एक निर्वासित आहें.

" मी खरोखरीच निर्वासित आहें. माझ्या आत्म्याची भाषा कोणाहि माणसाला समजत नाहीं.

" होय, माझीं स्वप्नें, माझ्या कल्पना अगदींच विचित्र आहेत. अशीं स्वप्नें कुणाहि माणसाला पडत नाहींत. "

जीवनाच्या सौंदर्यदर्शनानें हृदयांतील आसक्ति गळून गेल्यामुळें जिब्रानच्या जीवनांत प्रेमाला कायमची वस्ती करतां आली. जिब्रान हा आधुनिक काळांतील थोर मानवतावादी कलावंत होऊन गेला. त्याचें मानवप्रेम कोठल्याहि मर्यादांनीं मर्यादित होऊं शकलें नाहीं. तो विश्वाचा नागरिक बनला.

पण विश्वप्रेमाच्या धुंदींत त्याला सामाजिक अन्यायांचा विसर पडला नाहीं. विश्वप्रेमानें त्याला सर्वांगीण क्रांतिकारक बनविलें. तो म्हणतो,

" जीवन आणि मरण यांच्याप्रमाणेंच मीं स्वातंत्र्यावरहि प्रेम केलें आहे आणि जसजसें माझें प्रेम वाढत गेलें तसतसें जुलूम आणि तिरस्कार यांच्या गुलामगिरींत मानव कसा पिचत आहे यासंबंधींचें माझें ज्ञानहि वाढूं लागलें. "

आपल्या 'साक्षात्कार' या गद्यकाव्यांत त्यानें पुढील उद्गार काढले आहेत :

" प्रेम आणि त्यापासून जें कांहीं निघतें, क्रांति आणि तिच्यापासून जें कांहीं उत्पन्न होतें, स्वातंत्र्य आणि त्यायोगें जें कांहीं उजेडांत येतें तीं सारीं परमेश्वराचीं स्वरूपें आहेत. आणि परमेश्वर हा सान्त व चेतन विश्वाचा अनन्त आत्मा आहे. "

खलील जिब्रानचें हें सारें सौंदर्यदर्शन त्यानें तरुणपणीं लिहिलेल्या पुढील गद्यकाव्यांत संपूर्णपणें व्यक्त झालेलें कोणालाहि आढळून येईल. महाराष्ट्रांतील साहित्यरसिकांनीं जिब्रानच्या या सौंदर्यदर्शनाचा नीट अभ्यास केला तर त्यांना महाराष्ट्रांत सध्यां पसरत असलेल्या सौंदर्यवादाच्या विकृतीची पारख होऊं शकेल आणि जीवनाच्या मूल्यांशीं खऱ्या कलावंताला कधींहि बेईमान होता येत नाहीं याची साक्ष पटेल अशी आशा बाळगून 'हिरे आणि हिरकण्या' हा जिब्रानच्या गद्यकाव्यांचा लहानसा संग्रह मराठीच्या अभ्यासकांस सादर करतों.

—स. ज. भागवत

## हे माझ्या मातेच्या बालकांनो !

माझ्याकडून तुम्हांला काय हवें आहे? हे माझ्या मातेच्या बालकांनो !

तुमची अशी इच्छा आहे काय कीं, मीं तुमच्यासाठीं नुसत्या सुंदर गप्पांनीं सजविलेले आणि निव्वळ स्वप्नांचीं छपरें असलेले असे निरर्थक आश्वासनांचे महाल रचावेत ?

कीं खोट्या नि भ्याड लोकांनीं बांधलेली ही इमारत मीं जमीनदोस्त करून टाकावी आणि बद्चलन नि बदमाष लोकांनीं उभे केलेले स्तंभ नेस्तनाबूत करून टाकावेत अशी तुमची इच्छा आहे ?

तुम्हांला हवें तरी काय? अखेर मीं काय करावें ? हे माझ्या मातेच्या लेंकरांनो !

तुम्हांला खूष करण्यासाठीं मी कबुतरांप्रमाणें गुटरगूं करूं कीं स्वत:ला आनंदित ठेवण्यासाठीं सिंहाप्रमाणें गर्जना करूं ?

मीं तुमच्यासमोर गाणीं गायिलीं– तुम्ही नाचलां नाहीं.

मीं तुमच्यासमोर विलाप केला– तुम्ही रडलां नाहीं.

तर मग मीं एकाच वेळीं आनंदानें नाचावें आणि शोकानें विलाप करावा, अशी तुमची इच्छा आहे कीं काय ?

तुमचे प्राण उपासमारीनें तडफडत आहेत.

आणि आत्मसाक्षात्काराची भाकरी दऱ्याखोऱ्यांतील दगडांपेक्षांहि विपुल आहे. परंतु ती तुम्ही खात नाहीं.

तुमचीं हृदयें तहानेनें व्याकुळ झालीं आहेत. आणि

जीवनाचा प्रवाह तुमच्या घरांच्या आसपास नद्यांप्रमाणें वाहत आहे. पण तुम्ही तें पीत नाहीं.

समुद्रामध्यें भरतीओहटी असते.

हृदयामध्यें चढउतार असतो.

ऋतूंमध्यें उन्हाळा-हिंवाळा असतो.

) परंतु सत्य हें मागें वळत नाहीं. पतित होत नाहीं. अथवा बदलत नाहीं.

तर मग तुम्ही सत्याचीं रूपें कां बिघडवितां ?

तुम्हांला चंद्राचें सौंदर्य आणि ताऱ्यांची भव्यता दाखवावी म्हणून मीं तुम्हांला रात्रीच्या स्तब्धतेमध्यें साद घातली. तुम्ही आपल्या अंथरुणावरून खडबडून उठलांत. तुम्ही तलवारींना हात घातलांत आणि धनुष्यबाण सज्ज केले. आणि तुम्ही ओरडलांत कीं, ' कुठें आहे तो दुष्मन ? आम्ही त्याचे तुकडे तुकडे करून टाकूं.' परंतु जेव्हां सकाळ झाली तेव्हां दुष्मन आपल्या फौजफाट्यासमवेत येऊन थडकला. मीं तुम्हांला हांक मारली. परंतु तुम्ही आपल्या अंथरुणांतून डोकेंहि वर काढलें नाहीं. इतकेंच नव्हे तर, स्वप्नांच्या फौजांकडून तुम्ही पराभूत झालांत.

मी तुम्हांला म्हणालों, " चला, आपण पर्वताच्या शिखरावर चढून जाऊं म्हणजे मी तुम्हांला जगांतील देश दाखवीन."

परंतु तुम्ही म्हणालांत, " आमच्या वाडवडिलांनीं याच दऱ्याखोऱ्यांत जन्म घालविले आणि याच डोंगराच्या सावलींत ते मेले, आणि येथील जमिनींतच त्यांना पुरण्यांत आलें.

तर मग आम्हीं हीं दरीं-खोरीं सोडून जेथें आमचे वाडवडील गेले नाहींत अशा ठिकाणीं कसें बरें जावें ? ”

मीं तुम्हांला सांगितलें कीं, “ चला, आपण मोकळ्या मैदानांत जाऊं म्हणजे मी तुम्हांला सोन्याच्या खाणी आणि जमिनींतील खजिने दाखवीन. ” तर तुम्हीं उत्तर दिलें, “ मैदानामध्यें चोर आणि लुटारू यांपासून धोका असतो. ”

मी म्हणालों, “ चला, ज्या ठिकाणीं समुद्र आपली संपत्ति लुटवितो त्या किनाऱ्यावर आपण जाऊं. ” पण तुम्ही म्हणालांत, “ लाटांच्या धडकांमुळें आमच्या आत्म्यांचा थरकांप उडतो आणि सागराच्या पोटांतील खळबळीमुळें आमचीं शरीरें निर्जीव बनतात. ”

मीं तुमच्यावर प्रेम करीत होतों. हे माझ्या मातेच्या बाळांनो !

परंतु त्या प्रेमामुळें माझें नुकसान झालें. आणि तुमचाहि कांहीं फायदा झाला नाहीं.

परंतु आज मी तुमचा तिरस्कार करतों. तिरस्कार हा एक पूर आहे. तो वाळलेल्या काटक्यांव्यतिरिक्त अन्य कांहींहि वाहून नेत नाहीं आणि जीर्णशीर्ण घरांव्यतिरिक्त दुसरें कांहींहि जमीनदोस्त करीत नाहीं.

मला तुमच्या दुबळेपणाची दया येते, हे माझ्या मातेच्या बालकांनो !

दया ही दुबळ्यांची व नालायकांची संख्या वाढविते आणि जीवनामध्यें कोणतीहि नवीन वस्तु निर्माण करीत नाहीं.

आज जेव्हां तुम्ही दुबळे आहांत असें मला दिसतें, तेव्हां

माझ्या रोमरोमाचा थरकांप उडतो आणि तुमच्याकडे पाहून माझ्या हृदयाचें अगदीं पाणी पाणी होऊन जातें.

तुमचें पतन आणि धूळदाण पाहून मी रडत होतों. माझे अश्रू स्फटिकाप्रमाणें स्वच्छ व निर्मळ होते. परंतु ते तुमचे गलिच्छ डाग धुऊन टाकूं शकले नाहींत. त्यांनीं माझ्या डोळ्यांवरील पटलें दूर केलीं, पण तुमचीं दगडासारखीं अंतः-करणें मऊ झालीं नाहींत. उलट, माझ्या हृदयांतील सहानु-भूतिहि ते हिरावून घेऊन गेले आणि आज मी तुमचीं दुःखें पाहून हंसतों आणि हास्य हा एक प्रचंड गडगडाट असतो. तो वादळाच्या पूर्वी होतो; नंतर नाहीं.

माझ्याकडून तुम्हांला हवें तरी काय, हे माझ्या मातेच्या बालकांनो ?

तुमची इच्छा अशी आहे काय कीं मी तुमच्या चेहऱ्यांचीं प्रतिबिंबें पाण्याच्या हौदांत दाखवावींत ? या, पळत या आणि पाहा कीं, तुमचे चेहरे किती कुरूप आहेत. या, आणि विचार करा कीं, भीतीनें तुमच्या डोकीचे केस कसे राखेसारखे पांढरेखड पडले आहेत ! रात्रींच्या जागरणांनीं तुमचे डोळे अंधाऱ्या खड्ड्यांप्रमाणें भकास बनविले आहेत. दुबळेपणा आणि भ्याडपणा यांमुळें तुमच्या गालांवर सुरकुत्या पडल्या आहेत आणि तुमचे चेहरे मृत्यूच्या पूर्वी पानगळ ऋतूंतील ( हिंवाळ्यांतील ) पानांप्रमाणें पिवळे पडले आहेत.

तुम्ही मजकडून काय अपेक्षा करतां ? हे माझ्या मातेच्या बाळांनो !

होय. तुम्ही जीवनाकडून कशाची अपेक्षा बाळगितां ?

जीवन तुम्हांला नेहमींच आपलीं मुलें समजतें.

परंतु तुमचे आत्मे चेटकिणींच्या आणि जादुगारांच्या तावडींत सांपडले आहेत.

तुमचीं शरीरें बदमाषांच्या व जुलमी लोकांच्या हातांत तडफडत आहेत.

आणि तुमचीं शहरें व खेडीं दुष्मनांच्या नि विजयी लोकांच्या पायांखालीं थरथरा कांपत आहेत.

तुम्ही सूर्याच्या समोर उभे राहून कोणत्या वस्तूची इच्छा बाळगतां ?

तुमच्या तलवारी शेंकडों वर्षांपासून बोथटलेल्या आहेत. आणि तुमचे बाण मोडलेले आहेत. आणि तुमचे भाले चिखलानें बरबटलेले आहेत.

तर मग तुम्ही युद्धाच्या आणि रक्तपाताच्या मैदानांत कां उभे आहांत ? तुमचा धर्म म्हणजे एक देखावा ( ढोंग ) आहे. तुमचा इहलोक म्हणजे खोटीं आश्वासनें आहेत. आणि तुमचा परलोक म्हणजे धुळीचे उडणारे कण आहेत.

तर मग तुम्ही जगतां तरी कशाला ?

दुर्दैवाच्या चक्रांतून सुटका होण्याचें एकमात्र साधन म्हणजे मृत्यु होय.

जीवन हा एक अटळ निश्चय आहे. तो तारुण्याचा मित्र आहे.

आयुष्याच्या दुबळ्या अंशाबरोबर राहणारा तो एक प्रयत्न आहे. आणि म्हातारपणाच्या अधीन असलेलें तें एक शहाणपण आहे.

परंतु हे माझ्या मातेच्या बालकांनो !

तुम्ही म्हातारे व दुबळेच जन्मलांत. नंतर तुमचीं डोकीं लहान होत गेलीं आणि तुमचीं कातडीं आंकसत गेलीं. अखेर शेंवटीं तुम्ही लहान मुलें बनलांत.

तुम्ही अडचणीच्या वेळीं एकमेकांकडे पाठ फिरवितां आणि एकमेकांवर दगडांचा वर्षाव करतां.

मानवता ही एक स्वच्छ व निर्मळ नदी आहे.

ती दुडदुड धांवत, उडया मारीत व गात येते.

ती पर्वतांचीं रहस्यें सागरांच्या तळापर्यंत घेऊन जाते.

परंतु तुम्ही—हे माझ्या मातेच्या बालकांनो ! तुम्ही मात्र, ज्यांच्या तळाशीं अळ्या व किडे वाढतात, आणि ज्यांच्या कांठावर काळे नाग वेटोळीं घालून बसलेले असतात अशीं घाणेरडीं डबकीं आहांत.

अस्मिता ( खुदी ) हा एक चमकदार आणि वर वर जाणारा असा पवित्र किरण आहे.

तो वाळलेल्या काष्ठांना जाळून भस्म करतो. तो वारें लागल्यानें जास्त तीव्र होतो. आणि देवांच्या चेहऱ्यांना प्रकाशमान बनवितों.

परंतु, हे माझ्या मातेच्या बालकांनो !

तुमची अस्मिता हीं एक राख आहे. वावटळी तिला उडवून बर्फाच्या ढिगांवर नेऊन टाकतात. आणि वादळें तिला वैराण प्रदेशांत नेऊन विखरून टाकतात.

मी तुमचा तिरस्कार करतों, हे माझ्या मातेच्या बालकांनो !

कारण तुम्ही श्रेष्ठत्वाचा व माहात्म्याचा तिरस्कार करतां,
मी तुम्हांला तुच्छ लेखतों..
कारण तुम्ही तुमच्या अस्मितेला तुच्छ लेखतां.
मी तुमचा दुष्मन आहें.
कारण तुम्ही परमेश्वराचे दुष्मन आहांत.
परंतु......
तुम्हांला नाहींच समजायचें तें !



## माझा अन्तरात्मा म्हणाला

माझा अंतरात्मा मला म्हणाला, "ज्या वस्तूंचा इतर सर्वजण तिरस्कार करतात त्यांच्यावर तूं प्रेम कर, आणि सगळें जग ज्यांची बदनामी करतें त्यांच्याशीं तूं मैत्री कर."

माझ्या अंतरात्म्यानें मला असें सांगितलें कीं, प्रेम हें फक्त प्रेम करणाऱ्या व्यक्तीचेंच माहात्म्य वाढवितें असें नसून, ज्या व्यक्तीवर प्रेम केलें जातें तिला देखील तें मोठेपणा मिळवून देतें. या वेळपर्यंत माझ्या दृष्टीनें प्रेम हें दोन खिळ्यांना बांधलेल्या धाग्याप्रमाणें होतें. परंतु आतां तें अनादि व अनंत असें एक तेजोवलय झालें आहे. त्यानें सबंध भूतकाळ व्यापून टाकला आहे आणि साऱ्या भविष्यकाळाला आपल्या बाहुपाशांत कायमचें कवटाळून घेण्यासाठीं तें वाढत आहे.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला सावध केलें आणि मला अशी शिकवण दिली कीं, 'रूप आणि रंग यांच्या पडद्याआड दडलेलें सौंदर्य तूं शोधून काढ.'

होय, माझ्या अंतरात्म्यानें मला अगदीं बजावून सांगितले कीं, 'जी जी वस्तु कुरूप व असुंदर समजली जाते ती ती सुस्वरूप आणि सुन्दर दिसूं लागेपर्यंत तूं तिच्याकडे टक लावून पाहा.' जोंपर्यंत माझ्या अंतरात्म्यानें मला अशी शिकवण व प्रेरणा दिली नव्हती तोंपर्यंत मला सौंदर्य हें धुराच्या लोटांमध्यें थरथरणाऱ्या दीपशिखांप्रमाणें भासत होतें; परंतु आतां धूर

नाहींसा झाला आहे आणि मला ज्योतीशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला अशी सल्ला व प्रेरणा दिली कीं, ' जे कंठांतून निघत नाहींत अथवा जे जिभेच्या द्वारांहि व्यक्त होत नाहींत असे ध्वनी तूं ऐक. '

त्यानें असें सांगण्यापूर्वी मला फारच कमी ऐकूं येत असे आणि गोंगाट व कानठळ्या बसविणारे कर्कश आवाज यांच्या व्यतिरिक्त दुसरें कांहींहि माझ्या कानांत शिरत नसे.

परंतु आतां मी निःस्तब्धतेचे स्वर ऐकण्यास शिकलों आहें आणि युगानुयुगांचीं पवित्र गीतें गाणारे गवयी दिग्देवतेचीं जीं स्तोत्रें गातात आणि शाश्वततेचीं जीं रहस्यें उकलून दाखवितात तीं सर्व मला ऐकूं येऊं लागलीं आहेत.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला अशी सल्ला व प्रेरणा दिली कीं, ' जें प्याल्यांतून भरलें जात नाहीं, जें हातांनीं उचललें जात नाहीं आणि ज्याला ओठांचा स्पर्श होत नाहीं, असें मद्य तूं पी.'

त्या दिवसापर्यंत माझी तहान ही राखेच्या ढिगाऱ्यांत लपलेल्या व कुठल्याहि झऱ्याच्या थेंबभर पाण्यानेंहि विझूं शकेल अशा एका मंद ठिणगीसारखी होती.

परंतु आतां माझ्यांतील तीव्र तळमळ हीच माझा प्याला बनली आहे, प्रेम हें माझें मद्य बनलें आहे आणि एकान्त हा माझा आनंद बनला आहे.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला अशी सल्ला व प्रेरणा दिली कीं, ' जी वस्तु अदृश्य आहे तिचा तूं शोध कर ' आणि त्यानें मला असें दाखवून दिलें कीं, ज्या वस्तूला आपण घट्ट पकडूं पाहतों तिच्याविषयीं आपल्या मनांत अभिलाषा असते.

त्या दिवसापर्यंत मला हिंवाळ्यामध्यें उष्णतेमुळें आणि उन्हाळ्यामध्यें गार वाऱ्याच्या झुळुकीमुळें समाधान होत असे. परंतु आतां माझीं बोटें धुक्याप्रमाणें बनलीं आहेत आणि त्यांच्या पकडींत असलेल्या सर्व वस्तूंना तीं खालीं पडूं देत आहेत आणि ज्या अदृश्य वस्तूंसंबंधीं माझ्या मनांत अभिलाषा निर्माण झालेली आहे, त्यांना तिच्यांत मिसळून जाऊं देत आहेत.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला अशी सल्ला आणि असें निमंत्रण दिलें कीं, ' ज्याला मूळ नाहीं, देंठ नाहीं, फूल नाहीं अथवा कुठल्याहि डोळ्यानें ज्याला पाहिलेलें नाहीं, अशा रोपट्याचा सुगंध तूं हुंग. '

त्यानें मला असें सांगण्यापूर्वीं मी हिरव्यागार बागबगीच्यांतून, मधुर सुवास असलेल्या वनस्पतींच्या फुलदाण्यांमधून आणि धूपदाण्यांमधून सुगंधाचा शोध करीत असे.

परंतु आतां कदाचित् जाळतांहि येणार नाहीं असा एकच धूप मला माहीत आहे. आणि जगांतील सर्व उपवनांतील सुगंधांहून आणि विश्वांतील सर्व पवनांहून अधिक सुवासित अशा हवेमध्यें मी श्वासोच्छ्वास करतों.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला असा आदेश दिला कीं, ‘ जेव्हां तुला त्या अज्ञानांतून आणि अलौकिकांतून घातलेली साद ऐकूं येईल तेव्हां तूं ताबडतोब असें उत्तर दे कीं, ‘ मी तयार आहें. ”

यापूर्वी मीं बाजारांत दवंडी पिटणाऱ्याच्या आवाजाशिवाय इतर कोणत्याहि आवाजाला उत्तर दिलें नव्हतें अथवा आंखलेल्या आणि रुळलेल्या रस्त्याव्यतिरिक्त अन्य कोणत्याहि मार्गावरून मी चाललों नव्हतों.

परंतु आतां अज्ञाताच्या शोधार्थ जाण्यासाठीं मला ज्ञानाचा वेगवान् अश्व मिळाला आहे आणि ज्यावरून मला धोक्याच्या शिखरापर्यंत पोहोंचावयाचें आहे, तो रस्ता एखाद्या शिडीप्रमाणें सोपा बनला आहे.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला असें बजावून सांगितलें कीं, “ यापूर्वी एक ‘ काल ’ होता आणि यापुढें एक ‘ उद्यां ’ असणार, या म्हणीच्या साहाय्यानें तूं वेळेचें मोजमाप कर. ”

त्या क्षणापर्यंत मी असें मानीत होतों कीं, भूतकाळ हें एक नाहींसें झालेलें व संपूर्णपणें विस्मृत होणारें असें युग आहे आणि भविष्यकाळ हा एक असा कालावधि आहे कीं, जेथपर्यंत मी कधींहि पोहोंचूं शकणार नाहीं.

परंतु आतां मला हें माहीत झालें आहे कीं, लहानशा वर्तमानांतच सारा काळ आणि काळामध्यें समाविष्ट असलेलें सर्व कांहीं सामावलें जातें आणि खरें होतें.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला असें सांगितलें कीं, "येथें, तेथें आणि त्या तिकडे या शब्दांनीं व्यक्त होणाऱ्या दिग्-बंधनांनीं तूं जखडलेला नाहींस."

त्या वेळपर्यंत मी माझ्या टेकडीवर उभा राही आणि इतर सर्व टेकड्या माझ्यापासून अगदीं वेगळ्या व दूरदूर असल्यासारख्या मला दिसत.

परंतु आतां मला हें समजलें आहे कीं, ज्या टेकडीवर मी उभा आहें तिच्यांत वस्तुतः सर्व टेकड्या समाविष्ट झालेल्या आहेत आणि ज्या दरींतून मी चालतों तिच्यांत सर्व दऱ्या सामावलेल्या आहेत.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला अशी सल्ला व प्रेरणा दिली कीं, 'जेव्हां इतर लोक झोंपलेले असतील तेव्हां तूं जागा राहा आणि जेव्हां ते जागे असतील तेव्हां तूं झोंपीं जा.'

कारण, माझ्या आतांपर्यंतच्या आयुष्यांत मीं त्यांचीं स्वप्नें पाहिलेलीं नव्हतीं अथवा त्यांनींहि माझीं स्वप्नें पाहिलेलीं नव्हतीं.

परंतु आतां मला दिवसां स्वप्नांचे पंख फुटतात आणि रात्रीच्या वेळीं लोक झोंपीं जातात तेव्हां ते किती मुक्त व स्वतंत्र आहेत हें पाहून मी आनंदित होतों.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला अशी सल्ला व प्रेरणा दिली कीं, 'फाजील स्तुतीमुळें तूं कधीं शेफारून जाऊं नकोस अथवा निंदेच्या भीतीनें कधीं दुःखी-कष्टीहि होऊं नकोस.'

त्या दिवसापर्यंत मला आपल्या स्वतःच्याच हातांनीं बनविलेल्या कलाकृतीच्या योग्यतेविषयीं शंका वाटत असे. परंतु आतां मला हें समजलें आहे कीं, ‘ झाडें वसंत ऋतूंत मोहर धारण करतात आणि उन्हाळ्यांत फळांना जन्म देतात. तीं पानगळ ऋतूंत आपलीं सगळीं पानें टाकून देतात आणि हिंवाळ्यांत अगदीं उघडीं-नागडीं बनतात. पण हीं सर्व स्थित्यंतरें घडून येत असतां त्यांच्या अंतःकरणांत ताठा निर्माण होत नाहीं, भीति उत्पन्न होत नाहीं किंवा त्यांना लाजहि वाटत नाहीं. ’

*

माझ्या अंतरात्म्यानें मला असा सल्ला व खात्री दिली कीं, ‘ तूं बुटकबैंगणापेक्षां मोठाहि नाहींस अथवा दैत्यापेक्षां लहानहि नाहींस. ’

त्यापूर्वीं माझी अशी समजूत होती कीं, मानवाचे दोन प्रकार आहेत. एक म्हणजे ज्यांच्याकडे मी उपहासानें व तिरस्कारानें पाहीन अथवा ज्यांच्याबद्दल मला कींव येईल असे दुर्बल आणि दुसरा म्हणजे एक तर ज्यांचे हुकूम मी निमूटपणें पाळीन अथवा ज्यांच्याविरुद्ध बंड करून उठेन असे प्रबल.

परंतु आतां मला हें माहीत झालें आहे कीं, ज्या मातीपासून इतर सगळीं माणसें निर्माण केलीं गेलीं आहेत त्याच मातीपासून मलाहि बनविण्यांत आलें आहे; माझ्या शरीरांत जीं मूलतत्त्वें आहेत तींच त्यांच्याहि शरीरांत आहेत. माझा अंतरात्मा हा त्यांचा अंतरात्मा आहे, माझा संघर्ष हा त्यांचा संघर्ष आहे आणि त्यांची यात्रा ही माझी यात्रा आहे. ते उच्छृंखल असतील तर मीहि उच्छृंखल आहे आणि ते

सत्कृत्य करीत असतील तर मीहि त्यांच्या त्या सत्कृत्यांत वांटेकरी आहें. त्यांचें उत्थान होत असेल तर त्यांच्याबरोबर माझेंहि उत्थान होत आहे आणि ते मागें पडत असतील तर त्यांच्याबरोबर मीहि मागें राहात आहे.

*

माझ्या अंतरात्म्यानें मला अशी सल्ला व सूचना दिली कीं, 'तुझ्या ठिकाणीं जो प्रकाश आहे तो तुझा प्रकाश नव्हे हें तूं ओळख. तसेंच, तुझें गीत तुझ्या अंतःकरणांत निर्माण झालेलें नाहीं हेंहि तूं ओळख.

कारण, जरी तूं प्रकाशाबरोबर प्रवास करीत असलास तरी तूं प्रकाश नव्हेस आणि जरी तूं तारांनीं जखडलेली वीणा असलास तरी ती वीणा वाजविणारा तूं नव्हेस.'

*

हे माझ्या बांधवांनो, ज्याप्रमाणें माझ्या अंतरात्म्यानें मला सल्ला दिला आणि प्रकाश दाखविला, त्याचप्रमाणें पुष्कळ वेळां तुमच्या अंतरात्म्यानें तुम्हांला सल्ला दिली आहे आणि प्रकाश दाखविला आहे. कारण मीं आपल्या ध्यानावस्थेंत जे शब्द ऐकले, त्याच शब्दांच्या द्वारें मी आपल्या अंतःकरणांतील रहस्यें उकलून दाखवितों आणि तुम्ही मात्र आपल्या अंतःकरणांतील रहस्यें संभाळून ठेवतां या एका गोष्टीव्यतिरिक्त आपल्यामध्यें कांहींहि फरक नाहीं.

परंतु तुमचें हें संभाळून ठेवणें देखील माझ्या बोलण्याइतकेंच चांगलें आहे. [१२-१-१९२२]



## निशा-गीत

रात्रीची वेळ.

सर्वत्र सामसूम झालें आहे आणि स्वप्नें निःस्तब्धतेंत दडत आहेत. चंद्र उगवत आहे.

दिवसावर नजर ठेवण्यासाठीं त्याला डोळे आहेत.

ये, वनकन्यके ये. ज्या ठिकाणीं प्रेमी युगुलें एकमेकांना भेटतात त्या द्राक्षांच्या मळ्यांत आपण जाऊं. कारण कदाचित् आपण देखील त्या ठिकाणीं प्रीतीच्या मधुर द्राक्षरसानें आपल्या अभिलाषेची कोरड शमवूं शकूं.

ऐक,

टेकडयांनीं आपल्या हिरव्या सुगंधानें भरून टाकलेल्या दऱ्यांमध्यें कोकिळ पक्षी आपलें गीत ओतीत आहे.

प्रिये, भिऊं नकोस,

तारे आपल्या भेटीचें गुपित फोडणार नाहींत आणि रात्रीचें हळुवार धुकें आपल्या आलिंगनावर पांघरूण घालील. भिऊं नकोस. पिशाच्चांची तरुण नवरी आपल्या जादूनें भारलेल्या गुहेंत प्रीतीची मदिरा पिऊन आणि अप्सरांच्या डोळ्यांपासून स्वतःला लपवून स्वस्थ झोंपलेली आहे.

आणि पिशाच्चांचा राजा देखील आपल्याजवळून जाऊं लागला तरी प्रीति त्याला परत फिरवील.

कारण, माझ्यासारखाच तोहि एक प्रेमी नाहीं काय? आणि जी गोष्ट तो स्वतःच्या अंतःकरणांत बाळगितो ती तो बाहेर फोडील काय? [ मार्च १९१७ ]



## कीर्ति

ओहटी सुरू झाली होती. समुद्राच्या लाटा ओसरूं लागल्या होत्या. अशा वेळीं मी वाळूवरून चालूं लागलों. मीं खालीं वांकून वाळूवर एक रेघ ओढली. त्या रेघेनें जणूं माझ्या मनांतील विचार आणि माझ्या आत्म्याची आकांक्षा यांची अभिव्यक्ति केली.

नंतर पुन्हां भरती आली तेव्हां मी त्याच समुद्रकिनाऱ्या-कडे गेलों. मीं वाळूवर जें कांहीं लिहिलें होतें तें सगळें पुसून गेलें होतें.

परंतु त्या ठिकाणीं कुठल्याशा आंधळ्याच्या हातांतील काठीचीं चिन्हें मात्र उमटलेलीं दिसत होतीं !

[ ऑक्टोबर १९१७ ]



## तूं माझा भाऊ आहेस
## आणि मी तुझ्यावर प्रेम करतों

तूं माझा भाऊ आहेस आणि आपण दोघे एका पवित्र आत्म्याचे पुत्र आहोंत.

तूं माझ्यासारखा आहेस. कारण आपण दोघे एकाच निसर्गाच्या दोन शरीरांमध्यें बंदिस्त आहोंत.

तूं जीवनाच्या राजमार्गावरील माझा सहप्रवासी आहेस आणि ढगांच्या मागें लपलेल्या सत्याची प्राप्ति करून घेण्यांत माझा सहकारी आहेस.

तूं मानव आहेस—हे भाई, मीं तुजवर प्रेम केलें आहे आणि अद्यापिहि करीत आहें.

तूं मजसंबंधीं कांहींहि म्हण.

कारण उद्यां तुझी पाळी येईल आणि तुझी प्रतिज्ञा ही त्याच्या ( परमेश्वराच्या ) आज्ञेपुढें एक दुर्बळ शब्द ठरेल आणि तुझा अंतिम निवाडा करण्याच्या वेळीं त्याला त्या प्रतिज्ञेचा उपयोग होईल.

माझ्याकडून तुला जें कांहीं हवें असेल तें घे. कारण, ज्याची वांटणी करून घेण्याचा तुला पूर्ण हक्क आहे, अशा मालाव्यतिरिक्त तूं दुसरें कांहींच मागत नाहींस आणि मीं माझ्या लोभासाठीं जमा केलेलें सामानच तूं घेत आहेस.

जें तुझ्या मनास येईल तें कर.

आणि तुला त्यांपैकीं कांहीं पसंत असेल तर तूं त्याच्याशीं मिसळून जा.

तुला जसें वाटेल तसें तूं माझ्याशीं वाग.

कारण, मी स्वतः माझ्या सत्य स्वरूपाला स्पर्श करण्यास समर्थ नाहीं.

माझें रक्त सांड आणि माझें शरीर जाळून टाक.

कारण, तूं माझ्या अस्मितेला धक्का लावूं शकणार नाहींस.

अथवा तिला ठारहि करूं शकणार नाहींस.

माझ्या हातापायांत बेड्या घाल, माझ्याबरोबर तुरुंगाच्या अंधारकोठडींत चल.

तूं माझ्या कल्पनेला डांबून ठेवूं शकणार नाहींस. कारण, ती वातावरणांत तरंगणाऱ्या सुगंधित वाऱ्याच्या झुळुकीप्रमाणें स्वतंत्र आहे. तिला कोणतीहि सीमा नाहीं अथवा आदि-अंतहि नाहीं.

तूं माझा भाऊ आहेस आणि मी तुझ्यावर प्रेम करतों. तुझ्या मशिदींत नमाज़ पढतांना, तुझ्या चर्चमध्यें गुडघे टेकतांना आणि तुझ्या मंदिरांत प्रार्थना करतांना मी आणि तूं—आपण दोघे एकाच धर्माचे पुत्र आहोंत. आणि तो ( धर्म ) आत्मा आहे.

आपण दोघे त्या धर्माला साकार बनवितों. त्याच्या भिन्न भिन्न शाखा म्हणजे अस्मितेच्या पूर्णावस्थेकडे अंगुलिनिर्देश करणाऱ्या ईश्वरभक्तीच्या हाताचीं बोटें आहेत.

## कवि

या जगामध्यें मी एक निर्वासित * आहें.

मला हद्दपार करण्यांत आलें आहे आणि मी अगदीं एकाकी आहें. हा एकाकीपणा मला दुःखी-कष्टी बनवितो, माझ्या विचारांना एका जादूच्या व अज्ञात साम्राज्याकडे वळवितो आणि दूरवरच्या व अदृश्य अशा प्रदेशाच्या सांवल्यांनीं माझीं स्वप्नें भरून टाकतो.

मी एक निर्वासित आहें.

मी माझ्या नातेवाईकांपासून आणि देशबांधवांपासून दूर पडलों आहे. मला त्यांच्यापैकीं कोणी भेटलें तर मी स्वतःशींच असें म्हणेन कीं,

' मग हा कोण ? याची माझी ओळख कुठली ? याच्याशीं मला निगडित करणारें हें बंधन कोणतें ? आणि याच्या शेजारीं बसण्यासाठीं म्हणून मी याच्याजवळ कां जात आहे ? '

मी एक निर्वासित आहें.

मी माझ्या स्वतःपासूनच हद्दपार केला गेलों आहें आणि

---

* निर्वासित म्हणजे ज्याला हद्दपार करण्यांत आलें आहे असा ( an exile ). हल्लीं आपल्याकडे पुष्कळदां शरणार्थी ( a refugee ) या अर्थानें हा शब्द वापरला जात आहे. परंतु या ठिकाणीं तो त्याच्या मूळ अर्थानेंच वापरला आहे. —अनुवादक.

माझी जीभ बोलत असलेली मला ऐकूं आली तर माझ्या कानांना तो आवाज अगदीं अपरिचित वाटतो.

कधीं कधीं मी अंतर्मुख होऊन स्वतःमध्येंच डोकावून पाहतों, तेव्हां त्या ठिकाणीं जो हंसतो आणि रडतो, जो हिम्मतहि करतो आणि भिऊनहि जातो असा माझा लपलेला अंतरात्मा मला दिसतो.

नंतर माझ्या अस्तित्वाला माझ्या अस्तित्वाविषयींच आश्चर्य वाटतें आणि माझा आत्मा माझ्या स्वतःच्याच आत्म्याला प्रश्न करतो.

आणि तरी देखील मी स्वतः अज्ञात धुक्यामध्यें लुप्त झालेला आणि निःशब्दतेच्या वस्त्रांमध्यें गुरफटलेला असा निर्वासितच उरतों.

मी एक निर्वासित आहें.

मला माझ्या शरीरांतून हद्दपार करण्यांत आलें आहे. आणि मी आरशासमोर उभा राहतों, तेव्हां माझ्या चेहऱ्यामध्यें असें कांहीं तरी असतें जें माझ्या आत्म्यामध्यें नाहीं आणि माझ्या डोळ्यांमध्यें असें कांहीं तरी असतें, जें माझ्या अंतःकरणाच्या खोल गाभ्यामध्यें नाहीं.

मी शहरांतील रस्त्यांवरून चालतों तेव्हां मुलें माझ्या मागून ओरडत येतात कीं, ‘ तो पाहा आंधळा माणूस ! चला, आपण त्याला टेकण्यासाठीं एक काठी देऊं. ’ आणि मी त्यांच्यापासून घाईघाईनें दूर पळून जातों.

मला तरुणींचा एखादा घोळका भेटतो, तेव्हां त्या प्रेमानें माझे कपडे धरून असें गातात कीं,

' हा एखाद्या भल्या मोठ्या फत्तरासारखा बहिरा आहे. चला, आपण याचे कान प्रीतीच्या व प्रणयाच्या गाण्यांनीं भरून टाकूं '

आणि मग मी त्यांच्या पासूनहि दूर पळून जातों.

जेव्हां मला बाजारामध्यें मध्यम वयाचे लोक भेटतात, तेव्हां ते माझ्याभोंवतीं गोळा होतात आणि जोरजोरानें ओरडतात कीं,

' हा एखाद्या थडग्याप्रमाणें मुका आहे. चला, आपण त्याची मुरगळलेली जीभ सरळ करूं. ' आणि मी त्यांच्यापासून भयभीत होऊन दूर पळून जातों.

आणि मी वयस्क लोकांच्या एखाद्या समूहाजवळ गेलों तर ते आपलीं थरथरां कांपणारीं बोटें माझ्याकडे दाखवितात व म्हणतात,

' हा एक पागल आहे. याची विचारशक्ति भुताखेतांच्या व पिशाच्चांच्या प्रदेशांत नाहींशी झालेली आहे. '

*

मी या जगांत एक निर्वासित आहें.

मी खरोखरींच निर्वासित आहें; कारण जरी मी पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील सारी पृथ्वी पायाखालीं घातली आहे, तरी मला कुठेंहि माझें जन्मस्थान आढळलें नाही; अथवा ज्यानें मला ओळखलें आहे किंवा ज्यानें माझें नांव ऐकलें आहे असा कोणीहि मला भेटला नाहीं.

दररोज सकाळीं जेव्हां मी जागा होतों तेव्हां मला असें आढळतें कीं, ज्या ठिकाणीं वरच्या बाजूनें भयंकर साप

भीति दाखवीत आहेत आणि सरपटणाऱ्या वस्तूंनीं जमीन व भिंती भरून गेल्या आहेत अशा एका अंधाऱ्या गुहेमध्यें मी स्वतः कैदेंत पडलों आहे.

मी बाह्य प्रकाशाचा शोध करूं लागलों म्हणजे माझ्या शरीराच्या सावल्या माझ्या समोरून चालूं लागतात. कुठें तें मला माहीत नाहीं. मात्र जें मला समजत नाहीं, त्याचा त्या शोध करतात आणि ज्याची मला गरज नाहीं तें त्या धरून ठेवतात.

संध्याकाळ झाली आणि मी परत येऊन आपल्या काट्यांच्या व पिसांच्या अंथरुणावर पहुडलों म्हणजे भीतिदायक व आनंद-दायक असे दोन्ही प्रकारचे चमत्कारिक विचार माझ्या मनाला मोहून टाकतात आणि आपलीं दुःखें व हर्ष यांच्या समवेत अभिलाषा मला वेढून टाकतात.

मध्यरात्र झाली म्हणजे अतीत युगांच्या छाया माझ्यावर पडतात आणि विसर पडलेल्या भूप्रदेशांचे आत्मे मजजवळ येऊन मजकडे पाहतात. आणि मग मीहि त्यांच्याकडे टक लावून पाहतों, त्यांच्याशीं बातचीत करतों. आणि जुन्या गोष्टींसंबंधीं विचारतों. तेव्हां ते अत्यंत दयाळूपणें आणि हंसतमुखानें माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देतात. परंतु मी त्यांना पकडून धरून ठेवण्याचा प्रयत्न करूं लागलों म्हणजे ते माझ्या हातून निसटून जातात आणि जणूं हवेच्या पाठीवर नुसता धूर असावा त्याप्रमाणें कुठल्या कुठें नाहींसे होतात.

*

मी या जगांत एक निर्वासित आहें.

मी खरोखरीच निर्वासित आहें. माझ्या आत्म्याची भाषा कोणाहि माणसाला समजत नाहीं.

मी हळू हळू चालत निर्जन व ओसाड प्रदेशांत जातों आणि त्या ठिकाणीं नद्या दऱ्याखोऱ्यांतून वर चढून पर्वतशिखरावर जात असलेल्या मला दिसतात. माझ्या डोळ्यांसमोर उघडीं-बोडकीं झाडें पानांफुलांनीं बहरतात, फळें धारण करतात आणि आपलीं निर्जीव पानें फेंकून देतात. हें सर्व एका क्षणांत घडतें आणि माझ्या डोळ्यांसमोर त्यांच्या फांद्या खालच्या जमिनीवर पडतात आणि त्यांचे काळे साप सरपटूं लागतात.

होय, माझीं स्वप्नें, माझ्या कल्पना अगदींच विचित्र आहेत. अशीं स्वप्नें कुणाहि माणसाला पडत नाहींत.

सकाळच्या प्रहरीं पक्षी गाणीं गात उडत असलेले आणि विलाप करीत असलेले मला दिसतात.

ते पक्षी खालीं उरतात आणि माझ्या डोळ्यांसमोर मोकळे सुटलेल्या लांबसडक केसांच्या नग्न स्त्रियांचें रूप धारण करतात असें मला दिसतें. त्या स्त्रिया काजळ घातलेल्या आपल्या डोळ्यांच्या पापण्यांतून प्रेमासाठीं मजकडे पाहतात, मधांत बुडविलेल्या ओठांनीं मजकडे पाहून हंसतात आणि चंदनानें व धुपानें सुगंधित झालेले आपले पांढरे शुभ्र हात माझ्याकडे पसरतात. परंतु मी त्यांच्याकडे टक लावून पाहतों न पाहतों तोंच वातावरणामध्यें आपल्या उपरोधिक हास्याचे पडसाद दुमदुमत ठेवून ढवळलेल्या धुक्याप्रमाणें त्या नाहींशा होतात.

*

मी या जगांत एक निर्वासित आहें.

मी एक कवि आहें. जीवन जें कांही गद्यामध्यें विखरून टाकतें तें मीं पद्यामध्यें गोळा करतों आणि जीवन पद्यामध्यें जें गोळा करतें तें मी गद्यामध्यें पसरून टाकतों.

आणि म्हणून मीं एक निर्वासित आहें.

आणि जोंपर्यंत मृत्यु मला वर उचलून घेणार नाहीं व माझ्या स्वतःच्या देशाला घेऊन जाणार नाहीं तोंपर्यंत मीं निर्वासितच राहणार.

(नोव्हेंबर १९१३)



## माझ्या हृदया, तूं स्तब्ध राहा!

हे माझ्या हृदया, तूं स्तब्ध राहा, हें अवकाश तुझें ऐकून घेण्यास तयार नाहीं.

स्तब्ध राहा, माझ्या हृदया! विलापानें आणि शोकानें जड झालेल्या निरभ्र आकाशाला तुझीं गाणीं सोसणार नाहींत.

स्तब्ध राहा, कारण रात्रीची भुताटकी तुझ्या रहस्यांच्या कुजबुजीकडे लक्ष देणार नाहीं आणि अंधाराची मिरवणूक तुझ्या स्वप्नांसमोर येऊन थांबणार नाहीं.

स्तब्ध राहा, माझ्या हृदया, पहांट होईपर्यंत स्तब्ध राहा. कारण जो धीरानें सकाळची प्रतीक्षा करतो तो सामर्थ्यशाली बनून सकाळचें स्वागत करतो आणि जो कोणी प्रकाशावर प्रेम करतो त्याच्यावर प्रकाशहि प्रेम करतो.

स्तब्ध राहा, माझ्या हृदया, आणि माझें म्हणणें ऐक. स्वप्नांमध्यें एका जागृत झालेल्या प्रक्षुब्ध ज्वालामुखीच्या तोंडावर एक कोकिळ पक्षी गात असलेला मीं ऐकला. आणि एक भुईकमळाचें फूल बर्फांतून डोकें वर काढीत असलेलें पाहिलें. थडग्यांच्या दगडांवर नाच करीत असलेली एक नग्न अप्सरा मीं पाहिली आणि डोक्याच्या कवट्यांशीं हंसत हंसत खेळणारें एक बालक मला दिसलें.

आणि हें सर्व मीं स्वप्नामध्यें पाहिलें.

मी जागा झालों आणि माझ्या आजूबाजूस पाहिलें तेव्हां......

तो आग ओकीत असलेला भयंकर ज्वालामुखी मला दिसला. परंतु तो कोकिळ पक्षी मात्र गात असलेला मला ऐकूं आला नाहीं.

आभाळांतून दऱ्याखोऱ्यांवर आणि डोंगरपर्वतांवर बर्फ पसरला जात असलेला मीं पाहिला; परंतु त्या बर्फाच्या शुभ्र प्रेतवस्त्रामध्यें निःशब्द भुईकमळें गुंडाळलीं जात होतीं.

अनेक युगांच्या स्थिरतेसमोर उभ्या असलेल्या थडग्यांच्या ओळींच्या ओळी मीं पाहिल्या. परंतु त्यांच्यावर नाचणारें अथवा प्रार्थना करणारें मला कोणींहि दिसलें नाहीं.

नंतर मीं कवट्यांचे ढीगच्या ढीग पाहिले. परंतु वाऱ्याच्या खदखदाटाशिवाय दुसऱ्या कोणाचेंहि हंसणें त्या ठिकाणीं ऐकूं येत नव्हतें.

जागे झाल्यानंतर दुःख आणि क्लेश यांच्याशिवाय मला कांहींहि दिसलें नाहीं. तर मग स्वप्नांतील तीं सुखें आणि आनंद कुठें निघून गेले ? आपल्या झोपेचा तो थाटमाट कुठें गडप होतो ? तिची ती मूर्ति कशी नाहींशी होते ?

जोंपर्यंत आत्म्याच्या आशा-आकांक्षांची सावली झोंपेच्या बरोबर परत येणार नाहीं तोंपर्यंत तो ( आत्मा ) धीर धरून कसें सहन करणार ?

*

स्तब्ध राहा, माझ्या हृदया, आणि माझें म्हणणें नीट ध्यान देऊन ऐक.

अगदीं कालचीच गोष्ट. माझा आत्मा एक जून आणि बळकट वृक्ष होता. त्याचीं पाळेंमुळें पृथ्वीच्या अंतःकरणांत

खोलवर जाऊन घुसलेलीं होतीं आणि त्याच्या फांद्या अनन्ताला जाऊन भिडलेल्या होत्या. तो वृक्ष वसन्त ऋतूंत फुलांनीं बहरत असे आणि उन्हाळ्यांत फळांनीं भरून जाई.

शरद् (पानगळ) ऋतु आला, तेव्हां मीं चांदीच्या तबकांत फळें गोळा केलीं. आणि तीं चौरस्त्यावर नेऊन ठेवलीं. मग त्या ठिकाणीं जाणारे-येणारे लोक फळांसाठीं थांबले. त्यांनी फळें खाल्लीं आणि आपापल्या मार्गांनीं ते निघून गेले.

शरद्ऋतु संपला आणि त्याच्या गाण्याची जागा कण्हण्यानें व शोकगीतानें घेतली, तेव्हां मीं माझ्या त्या तबकाकडे दृष्टि टाकली आणि मला असें दिसलें कीं, लोकांनीं त्या ठिकाणीं फक्त एकच फळ शिल्लक ठेवलें आहे. मीं तें चाखून पाहिलें तेव्हां तें मला घायपातासारखें कडू आणि कच्च्या द्राक्षाइतकें आंबट लागलें. तेव्हां मी स्वतःशी म्हणालों,

“ धिक्कार असो मला ! मीं लोकांच्या ओठांवर तळतळाट ठेवले आणि त्यांच्या पोटांमध्यें वैरभावाची प्रस्थापना केली. तर मग हे माझ्या आत्म्या, पृथ्वीच्या उरांतून तुझ्या मुळांनीं शोषून घेतलेल्या त्या माधुर्याचें तूं काय केलेंस ? आणि तुझ्या फांद्यांनीं सूर्याच्या प्रकाशापासून शोषून घेतलेल्या त्या सुगंधाचें तूं काय केलेंस ? ”

आणि मग मीं माझ्या आत्म्याचें तें जुनें व मजबूत झाड मुळांसकट उपटून टाकलें. त्याच्या भूतकाळापासून मीं तें तोडून वेगळें केलें आणि त्याच्यावरील एक हजार वसंत ऋतूंचीं व एक

हजार शरद् ऋतूंचीं आवरणें काढून टाकलीं आणि मग मीं माझ्या आत्म्याचें झाड दुसऱ्या ठिकाणीं लावलें.

मीं तें काळाच्या मार्गापासून दूर असलेल्या एका शेतांत लावलें आणि त्याला पिण्यासाठीं माझे अश्रू व माझें रक्त देत आणि असें म्हणत त्याच्या शेजारीं सारी रात्र जागून काढली कीं,
' रक्तामध्यें एक प्रकारचा सुवास असतो आणि अश्रूंमध्यें एक प्रकारची गोडी असते. '

वसंत ऋतु परत आला, तेव्हां माझ्या हृदयाचा वृक्ष पुन्हां मोहरला आणि उन्हाळ्यामध्यें त्याला फळें आलीं. पानगळ ऋतु आला, तेव्हां मीं पुन्हां एकदां पिकलेलें फळ तोडलें आणि तें सोन्याच्या तबकांत घालून चौकांत ठेवून दिलें. त्यानंतर तेथून किती तरी माणसें आलीं व गेलीं. परंतु तें फळ घेण्यासाठीं कोणीहि तिकडे फिरकलें नाहीं. तेव्हां मग मीं तें घेतलें व खाल्लें. मला असें आढळून आलें कीं, तें फळ मधासारखें मधुर, अमृतासारखें मिष्ठास, चमेलीच्या फुलासारखें सुवासिक आणि बाबिलोनियाच्या मद्यासारखें स्वादिष्ट होतें. तेव्हां मी मोठ्यानें ओरडून असें म्हणालों कीं,
' आपल्या ओठांवर धन्यवाद आणि पोटांत सत्य असावें अशी लोकांची इच्छा नसते; कारण धन्यवाद ही अश्रूंची कन्या आहे आणि सत्य हा दुःखाचा पुत्र आहे. '

नंतर मी परत फिरलों आणि काळाच्या रस्त्यापासून दूर असलेल्या शेतांतील माझ्या आत्म्याच्या एकाकी वृक्षाच्या सावलींत जाऊन बसलों.

*

स्तब्ध राहा, माझ्या हृदया, पहांट होईपर्यंत स्तब्ध राहा.

स्तब्ध राहा, कारण मृत वस्तूंच्या घाणीनें हें अवकाश जड झालें आहे. तें तुझा जिवंत श्वास आपल्या फुफ्फुसांत घेऊं शकत नाहीं.

स्तब्ध राहा, माझ्या हृदया, आणि माझें बोलणें ऐक.

अगदीं कालचीच गोष्ट. समुद्राच्या लाटांवर डोलणाऱ्या आणि वाऱ्यासरशीं या किनाऱ्याकडून त्या किनाऱ्याकडे जाणाऱ्या एखाद्या जहाजाप्रमाणें माझी कल्पना बनली होती आणि माझ्या कल्पनेचें जहाज जवळ जवळ रिकामेंच होतें. मात्र त्यांत इंद्रधनुष्याच्या सात रंगांप्रमाणें सात रंगांनी कांठोकांठ भरलेल्या सात बाटल्या होत्या.

कांहीं वेळानंतर असा एक क्षण आला कीं, जेव्हां मला समुद्राच्या पृष्ठभागावरून तरंगत राहण्याचा अगदीं कंटाळा आला आणि मी स्वतःशीं म्हणालों,

'माझ्या कल्पनेचें रिकामें जहाज बरोबर घेऊन ज्या गांवांत माझा जन्म झालेला आहे त्या गांवच्या बंदराला मी परत जाईन.'

आणि जेव्हां मीं आपलें जहाज हांकारलें, तेव्हां मी त्या सात रंगांनीं आपल्या जहाजाच्या बाजू रंगवूं लागलों.

त्यांपैकीं पिंवळा रंग सूर्यास्तासारखा, निळा आकाशासारखा, तांबडा रक्तासारख्या लालभडक वायुपुष्पासारखा दिसूं लागला. नंतर त्या जहाजाच्या शिडांवर आणि सुकाणूंवर डोळ्यांना मोहविणारीं व आल्हाद देणारीं चित्रें मीं रेखाटलीं आणि हें काम पुरें झालें तेव्हां माझ्या कल्पनेचें तें जहाज एखाद्या

द्रष्ट्याच्या आत्मसाक्षात्कारासारखें दिसूं लागलें आणि तें समुद्र व आकाश या दोन अनंतांमध्यें तरंगूं लागलें.

पुढें माझें जहाज बंदरांत जाऊन पोहोंचलें तेव्हां सर्व लोक मला भेटायला आले. त्यांनीं मोठमोठ्यानें घोषणा करून आणि आनंदानें माझें स्वागत केलें व आपले पडघम वडवीत नि वेताच्या बांसऱ्या वाजवीत त्यांनीं मला शहरांत नेलें.

त्यांनी हें सर्व अशासाठी केलें की, माझें जहाज त्यांच्या डोळ्यांना मोठें मोहक वाटलें. परंतु माझ्या त्या कल्पनेच्या जहाजावर कोणीहि चढलें नाहीं अथवा मीं तें जहाज रिकामेंच बंदरांत आणलें आहे हें देखील कोणीं पाहिलें नाहीं.

तेव्हां मी स्वतःशीं म्हणालों, 'मीं लोकांची दिशाभूल केली आहे. सात रंगांच्या बाटल्यांनीं मीं त्यांच्या अन्तश्चक्षूंना व बाह्य डोळ्यांना फसविलें आहे.'

आणि एक वर्ष निघून गेल्यानंतर मी पुन्हां माझ्या कल्पनेच्या जहाजावर चढलों आणि समुद्रप्रवासास निघालों. मी पूर्वेकडील बेटांच्या बाजूस गेलों आणि त्या ठिकाणीं मी ऊद, धूप व चंदन गोळा करून तें सर्व माझ्या जहाजांत भरलें.

तेथून दक्षिणेकडील बेटांच्या बाजूस गेलों. त्या ठिकाणीं मला दुर्मिळ असें रेशमी व मखमली कापड आणि सर्व प्रकारच्या फिती, झालरी व नक्षीकामाचे नमुने मिळाले.

तेथून मी पश्चिमेच्या बेटांकडे गेलों आणि त्या ठिकाणीं मला चिलखतें, शिरस्त्राणें, भाले, तलवारी आणि नाना प्रकारचीं इतर शस्त्रें मिळालीं.

अशा प्रकारें पृथ्वींतील मौल्यवान् आणि आश्चर्यकारक वस्तूंनीं मीं माझ्या कल्पनेचें जहाज भरलें आणि माझ्या स्वतःच्या शहराच्या बंदराला परतलों. त्या वेळीं मी आपल्या मनांत असें म्हणालों कीं,

' आतां माझ्या गांवचे लोक स्तुति करण्यास पात्र मनुष्य म्हणून माझी वाहवा करतील आणि गाणीं म्हणत व बाजे वाजवीत ते मला निश्चितपणें बाजारपेठेंत घेऊन जातील. '

परंतु अरेरे ! मी बंदरांत पोहोंचलों तेव्हां मला भेटण्यासाठीं व माझें स्वागत करण्यासाठीं एकहि मनुष्य आला नाहीं. मीं माझ्या शहराच्या रस्त्यांत एकट्यानेंच प्रवेश केला; परंतु मजकडे कोणी ढुंकूनहि पाहिलें नाहीं.

मीं पेठेंतील चौकांत उभा राहून तमाम लोकांना ओरडून असें सांगितलें कीं, ' मी तुमच्यासाठीं सबंध जगांतील फळफळावळ आणि उत्तमोत्तम वस्तू आणल्या आहेत. '

परंतु आपल्या चेहऱ्यावर हंसें आणि ओठांवर उपहास आणून त्यांनीं मजकडे पाहिलें आणि लागलीच मजकडे पाठ फिरविली. अशा प्रकारें मी दुःखीकष्टी व उदासीन होऊन बंदराकडे परत फिरलों.

माझी नजर माझ्या जहाजावर जातांच एक विशिष्ट गोष्ट माझ्या ध्यानांत आली. तिच्याकडे मी प्रवासांत आणि चांगला चांगला माल शोधण्याच्या नादांत मुळींच लक्ष दिलें नव्हतें. म्हणून मी एकदम शरमिंदा होऊन ओरडलों,

' पाहा, समुद्राच्या लाटांनीं माझ्या जहाजावरील सातहि रंग पुसून टाकले आहेत. आणि आतां हें एखाद्या हाडाच्या

सांगाड्याप्रमाणें दिसत आहे. तसेंच वारे, वादळें आणि सूर्याची उष्णता यांनीं त्याच्या शिडावरील आश्चर्यकारक व मजेदार चित्रें खोडून टाकलीं आहेत. यामुळें हीं शिडें विरलेल्या व फाटून चिंध्या झालेल्या कपड्याप्रमाणें दिसत आहेत. खरोखर, समुद्रपृष्ठावर तरंगणाऱ्या या रत्नकरंडकांतून मीं जगांतील मौल्यवान् वस्तूंचीं भांडारें गोळा केलीं होतीं व तीं घेऊन मी माझ्या लोकांकडे परत आलों होतों. परंतु त्यांनीं मजकडे पाठ फिरविली. कारण त्यांचे डोळे बाह्य भपक्याखेरीज इतर कांहींच पाहात नाहींत.'

त्याच क्षणीं मीं आपल्या कल्पनेच्या जहाजाचा त्याग केला आणि मृतांच्या नगरीकडे गेलों. त्या ठिकाणीं मी पांढऱ्या शुभ्र थडग्यांच्या समूहांत बसलों आणि त्यांच्या रहस्यांविषयीं विचार करूं लागलों.

*

स्तब्ध राहा, माझ्या हृदया, स्तब्ध राहा !

वादळ तुझ्या खोल गाभ्यांतील कुजबुजीला वेडावीत असलें तरी तूं स्तब्ध राहा.

स्तब्ध राहा, माझ्या हृदया, पहांट होईपर्यंत स्तब्ध राहा.

कारण जो कोणी पोटीं धीर धरून सकाळची प्रतीक्षा करील, त्याला सकाळ सुकुमारपणें आलिंगन देईल.

ती पाहा, माझ्या हृदया, पहांट झाली.

तुझ्यामध्यें अद्यापिहि शब्दशक्ति असेल तर तूं बोल.

ती पाहा माझ्या हृदया, प्रभात मिरवत येत आहे.

रात्रीच्या नीरवतेनें तुझ्या खोल गाभ्यामध्यें अशा एका गीताला गति दिली नाहीं काय कीं ज्यानें तूं सकाळचें स्वागत करावेंस ?

दरीच्या वरच्या बाजूस उडणाऱ्या कबुतरांचा व कृष्ण-पक्ष्यांचा तो स्वैरविहार पाहा. रात्रीच्या दराऱ्यानें त्यांच्या समवेत उडण्याची शक्ति तुझ्या पंखांत निर्माण केली नाहीं काय ?

पाहा, मेंढपाळ आपले मेंढरांचे कळप कोंडवाड्यांतून बाहेर काढून त्यांना चरावयास घेऊन जात आहेत. आपण त्यांच्या पाठोपाठ हिरव्यागार कुरणाकडे जावें अशी उत्कट अभिलाषा रात्रीच्या सावल्यांनीं तुझ्या अंतःकरणांत निर्माण केली नाहीं काय ?

द्राक्षांच्या मळ्याकडे धांव घेणारे ते तरुण आणि त्या तरुणी पाहा. तूंहि उठून त्यांच्यांत सामील होणार नाहींस काय ?

ऊठ, माझ्या हृदया, ऊठ आणि प्रातःकालाबरोबर तूंहि हालचाल कर. कारण, आतां रात्र संपलेली आहे आणि तिचीं भयेंहि आपल्या काळ्याकुट्ट स्वप्नांसह नाहींशीं झालेलीं आहेत.

तेव्हां ऊठ, माझ्या हृदया, ऊठ, आणि आपल्या गाण्याची तान छेड; कारण जो आपल्या गाण्यानें प्रातःकाळाला साथ देत नाहीं तो निव्वळ अंधकाराचें अपत्य आहे.



## तूं आणि मी

तुझा विचार तुझ्यासाठीं आहे आणि माझी कल्पना मज-साठीं आहे.

तुझा विचार अशा एका महाभयंकर वृक्षासारखा आहे कीं, ज्याचीं पाळेंमुळें अंधानुकरणाच्या चिखलामध्यें रुतून बसलेलीं आहेत आणि ज्याच्या फांद्या स्थायित्वाच्या शक्तीनें पसरत असतात.

आणि माझी कल्पना वातावरणांत तरंगणाऱ्या ढगाच्या एका तुकड्यासारखी आहे. तो तुकडा थेंबाथेंबानें गळून पडतो, नंतर नदी बनून समुद्रापर्यंत जाऊन पोहोंचतो आणि मग लहान लहान मेघ बनून उंच उंच आकाशांत जाऊन पोहोंचतो.

तुझा विचार एखाद्या मजबूत व भरभक्कम बुरुजासारखा आहे. कोणतीहि दिशा या बुरुजाला आपल्याकडे ओढूं शकत नाहीं अथवा मोठमोठीं वादळें त्याला विचलित करूं शकत नाहींत.

आणि माझी कल्पना ही एक लवचिक व नाजुक डहाळी आहे. ती सर्व बाजूंना झुकते आणि वाऱ्याच्या झुळकीसरशीं ती हलूं लागली म्हणजे मन प्रसन्न व टवटवीत होतें.

तुझा विचार हा अशा एका जुनाट धर्माप्रमाणें आहे, जो तुझ्यामध्यें कांहीं बदल घडवून आणीत नाहीं अथवा स्वतःहि बदलत नाहीं.

आणि माझी कल्पना ही एक नवीन व अलौकिक वस्तु आहे. ती मला सकाळ-संध्याकाळ उलटें-सुलटें करीत असते आणि मीहि तिच्यांत बदल घडवून आणीत असतों.

*

तुझा विचार तुझयासाठीं आहे आणि माझी कल्पना मजसाठीं आहे.

तुमच्यापैकीं प्रत्येक बलवानानें प्रत्येक दुबळ्याला पायदळीं तुडवावें आणि धूर्त व कपटी माणसानें निष्पाप व भोळ्या माणसाला आपल्या जाळ्यांत अडकवीत राहावें, एवढाच तुझा विचार.

आणि माझी कल्पना मला असें सांगते कीं, ' तूं कुदळ घेऊन जमीन खोद नि तिला आपल्या रक्ताचें पाणी पाजवून फळें मिळव. आणि दगड नि माती यांचें एक घर बांध आणि कापसाचें अथवा लोंकरीचें वस्त्र तयार कर. '

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ' ज्यांना लोकांमध्यें खूप मान आहे अशा श्रीमंत व उच्च समजल्या जाणाऱ्या घराण्यांशीं संबंध जोडावेत. '

आणि माझी कल्पना मला असें सांगते कीं, ' तूं तुझ्या स्वतःवर विश्वास ठेव. '

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ' इतरांना सांगण्यासाठीं विचित्र व मोहक गोष्टी असाव्यात आणि कीर्तीच्या मागें धांवपळ करावी. '

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, ' गप्पागोष्टी व

कीर्ति या अनंत किनाऱ्यावरील वाळूच्या दोन कणांप्रमाणें आहेत असें तूं समज.'

तुझा विचार म्हणजे मोठेपणा आणि नफेबाजी यांसाठीं चाललेला झगडा आहे आणि माझी कल्पना म्हणजे सुरक्षितपणाची वृत्ति आणि स्वातंत्र्याचें प्रेम आहे.

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, 'ज्या ठिकाणचें सामानसुमान म्हणजे सोन्याचांदीवरील रंगीत नकशीकामाचे उत्कृष्ट नमुने आहेत आणि जेथील पडदे रेशमाचे आहेत अशा सुंदर महालांचीं स्वप्नें तूं पाहा.'

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, 'तुझा आत्मा आणि तुझें शरीर हीं इतकीं पवित्र झालीं पाहिजेत कीं, आपण विश्रांतीसाठीं डोकें कुठें टेकावें याचीहि पर्वा तुला वाटतां कामा नये.'

तुला फक्त एवढीच काळजी लागलेली असते कीं, आपल्याला मोठमोठे हुद्दे कसे मिळतील आणि लांबलचक पदव्या पदरांत पडून आपला गौरव कसा होईल.

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, 'तूं एक उपयुक्त सेवक बन.'

*

तुझा विचार तुझ्यासाठीं आहे. आणि माझी कल्पना मजसाठीं आहे.

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, 'तूं समाजशास्त्रीय नि धार्मिक ग्रंथ बन आणि कलेच्या व राजकारणाच्या भानगडींत अडकून पड.'

परंतु माझ्या कल्पनेचे सिद्धांत अगदीं स्पष्ट व उघड आहेत.

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ‘ ती स्त्री सुंदर आहे, ती कुरूप आहे, ती मोठी समजूतदार आहे, ती लायक आहे व ती नालायक आहे. ’

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, ‘ प्रत्येक स्त्री ही प्रत्येक पुरुषाची माता आहे, प्रत्येक स्त्री ही प्रत्येक पुरुषाची बहीण आहे आणि प्रत्येक स्त्री ही प्रत्येक पुरुषाची मुलगी आहे. ’

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ‘ तो चोर आहे, तो गुन्हेगार आहे, तो दुराचारी आहे, तो खुनी आहे आणि तो उद्धट आहे. ’

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, ‘ भांडवलदारांनीं आणि संग्रह करणाऱ्यांनीं चोर निर्माण केले आहेत. जुलूम व अत्याचार करणाऱ्यांनीं गुन्हेगार उत्पन्न केले आहेत. खून करणारा हा खून झालेल्याचा साथीदार आहे. दुराचारी हा सदाचाराचें फळ आहे आणि उद्धटपणा हा आज्ञाधारकपणाचा परिणाम आहे. ’

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ‘ तूं धर्मानें दाखवून दिलेले मार्ग, निर्णय आणि शिक्षा यांच्याविरुद्ध बंडाचा झेंडा उभा कर. ’

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, ‘ एकदां धर्मशास्त्र बनविलें गेलें कीं मग आपल्यांतील प्रत्येकजण त्याला विरोध तरी करील अथवा त्याच्यापुढें मान तरी लववील, आणि जीवनाचा एक मूलभूत कायदा आहे असें मानलें तर आमच्यापैकीं प्रत्येकजण तो कायदा चालविणारा आहे, असें मानलें

पाहिजे. खालीं पडणाऱ्यांपैकीं जो कोणी दुःखाचा निःश्वास सोडील तो त्यांच्यापैकीं ठरेल आणि स्वतःला श्रेष्ठ समजणाऱ्यांचा स्पर्श आपल्याला होऊं नये म्हणून जो आपला कपडा झटकील त्याला संकटांना तोंड द्यावें लागेल. अर्थात् जो मनुष्य खालीं घसरणार नाहीं आणि अवनतीच्या गर्तेतून वर निघाल्याबद्दल स्वतःची पाठ थोपटील, तो सबध मानवजातीच्या उत्थानाबद्दल अभिमान बाळगणारा आहे असें म्हटलें पाहिजे आणि जो स्वतः वांचल्याबद्दल अभिमान बाळगतो तो वस्तुतः स्वतःला जीवनापासून वांचविल्याबद्दल गर्व करीत असतो असें समजलें पाहिजे. '

तुझा विचार तुला असें सांगतो की, 'तूं तज्ज्ञ, कलावंत, शिक्षक, योग्यतेचा मूर्तिमंत पुतळा, तत्त्वज्ञानी आणि धार्मिक नेता बन.'

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, 'तूं प्रीति करणारा, ममता बाळगणारा, सत्यवक्ता, दृढनिश्चयी, बलिदान करणारा आणि द्रष्टा बन.'

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, 'ज्यूत्व, हिंदुत्व, बुद्धत्व, खिश्चनत्व आणि इसलामत्व'

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, 'एकमेव निशुद्ध धर्मांशिवाय दुसरें कांहीं नाहीं. तो व्यक्त होण्याच्या अनेक पद्धती निर्माण झाल्या असल्या तरी तो एकमेव निशुद्धच आहे. त्याचे मार्ग भिन्न भिन्न झालेले असले तरी तो मात्र हात आणि त्याचीं बोटें यांच्याप्रमाणें अभिन्नच आहे.'

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, 'काफिर, मुशरिक

( ईश्वर हा एकमेव नसून त्यांत इतरहि देव सामील झालेले आहेत असें समजणारा ), दहरी ( हें विश्व अनादि आहे असें समजणारा–सनातनी ), खारिजी ( हजरत अली यांना खलीफा न मानणारा ) आणि झिन्दीक ( ' झिन्दावेस्ता ' या पारशांच्या धर्मग्रंथावर श्रद्धा ठेवणारा–अग्निपूजक )...वगैरे ! '

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, ' दुःखी-कष्टी हृदयाचा, दीन-दुबळा व अत्याचारपीडित आणि आत्मा व बुद्धि नसणारा. '

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ' श्रीमंत, सामर्थ्यवान्, फकीर आणि दानशूर. '

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, ' आपण सर्वच भिकारी आहोंत. जीवनाशिवाय आपण सर्वजण गरजू आहोंत. आणि जीवनाव्यतिरिक्त दुसरा कोणीहि दानशूर नाहीं. '

*

माझी कल्पना माझ्यासाठीं आणि तुझा विचार तुजसाठीं आहे.

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ' राजकीय संस्था, परिषदा, भाषणें आणि करारनामे यांच्या जोरावर राष्ट्रें बनत असतात. '

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, ' राष्ट्रें कार्याच्या बळावर बनत असतात आणि कार्य हें दान व दया यांमध्यें असतें. कार्य हें रंगारीपणांत व रंगाऱ्याच्या भट्टीमध्यें असतें. कार्य हें उध्वस्त करण्यांत व बसविण्यांत असतें आणि कार्य हें लिहिण्यांत व छापण्यांत असतें. '

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ‘ जमातींचें श्रेष्ठत्व आणि सौजन्य हें त्या त्या जमातीच्या बहादुरांच्यामुळें असतें आणि म्हणून तूं नमरूद ( एका अधार्मिक बदमाष व मगरूर बादशहाचें नांव. यानेंच हजरत इब्राहीमना जाळून टाकण्या-साठीं आगींत फेंकलें होतें. परंतु ईश्वरी कृपेनें त्या आगीचा हिरवागार बगीचा बनला, असें सांगतात. ), बख्तनसर ( एका काफीर बादशहाचें नांव ), शिकंदर, कैसर आणि नेपोलियन यांचीं नांवें मोठ्या अभिमानानें व आनंदानें घेतोस.’

परंतु माझी कल्पना मला असें सांगते कीं, ‘ खरे बहादुर कन्फ्यूशस, लाओत्स, सॉक्रेटीस, प्लेटो, अली इब्न अबू तालिब, गझाली, जलालुद्दीन रूमी, कोपरनिकस आणि वास्टर हेच होते. ’

तुझा विचार तुला असें सांगतो कीं, ‘ बंदुका, तोफा, टँक्स, टारपेडो, विमानें आणि विषारी वायु यांतच अफाट ताकद आहे. ’

परंतु माझी कल्पना मला मोठ्या आवेशानें व खात्रीपूर्वक असें सांगते कीं, ‘ सत्याहून मोठी अशी कोणतीहि शक्ति नाहीं आणि खऱ्या गोष्टींपेक्षां जास्त दृढ असा अन्य कोणताहि निश्चय नाहीं. कित्येकदां सामानसुमान व शस्त्रसामग्री यांची मदत घेणाऱ्यांची सद्दी जास्त काळपर्यंत टिकली हें खरें, परंतु अखेरशेवटीं ते पराभूतच झाले.’

तुझा विचार अंश व पूर्ण, कार्य व कल्पना, स्थायित्व व अस्थायित्व या गोष्टी वेगवेगळ्या आहेत असें समजतो.

परंतु माझी कल्पना असें सांगते कीं, ‘ जीवनामध्यें एक-

रूपता आहे. ज्यांचा सर्व भार कल्पना नि आराखडे यांवर असतो, आणि त्या कल्पना नि ते आराखडे तुझ्या कल्पना नि तुझे आराखडे यांच्या दृष्टीनें बरोबर नसतात, त्यांच्या बाबतींत असें होतें कीं, ज्याला तूं कल्पनासाम्राज्यांत रममाण होणारा मनुष्य समजतोस तो कार्य करणाऱ्यांपैकीं असतो. आणि पुष्कळसे लोक असे आहेत कीं, ज्यांना तूं आधिभौतिक व कार्यमग्न समजतोस ते भ्रमांत गुरफटलेले नि अंधविश्वास बाळगणाऱ्यांपैकीं असतात.'



तुझा विचार तुझ्यासाठीं आणि माझी कल्पना मजसाठीं आहे.

भग्नावशेषांतून आणि कांट्याकुट्यांतून जाणाऱ्या आपल्या स्वतःच्या विचाराचें अनुकरण तूं कर.

परंतु मी मात्र जमीन व आकाश यांमध्यें निःस्तब्धपणें असणाऱ्या माझ्या कल्पनेच्या देखरेखीखालीं आहें.

तुझा विचार तुझ्यासाठीं आहे. तूं वाद्यसामग्री घेऊन त्याचीं गाणीं गा आणि उन्मादानें नाच.

परंतु माझी कल्पना म्हणजे तुझ्या वाद्यांच्या साथीवर प्राण देणारें शेवटचें गीत आहे.

तुझा विचार तुझ्यासाठीं आहे आणि जे मिळून मिसळून राहणें पसंत करतात, प्रेम करण्याची व आनंदी राहण्याची इच्छा बाळगतात, त्या सर्वांसाठीं तुझा विचार आहे.

आणि माझी कल्पना मजसाठीं आहे. ज्याच्या घरांत विचारपूस करणारें कोणी नाहीं, जो आपल्या नातेवाइकांमध्यें एखाद्या परदेशीय माणसाप्रमाणें असतो आणि ज्याचे आप्त-संबंधी त्याला वेडा समजतात अशा प्रत्येक माणसासाठीं माझी कल्पना आहे.

तूं तुझ्यासाठीं विचार कर आणि मी माझ्यासाठीं कल्पना करीन.



# आत्मा

आणि देवांच्या देवानें सौंदर्याला साकार बनविण्यासाठीं आत्मा उत्पन्न केला.

त्यानें त्याला प्रातःकालीन सुगंधित वायूचें माधुर्य, फुलांचा सुवास आणि चांदण्या रात्रीच्या प्रसन्नतेचें सौंदर्य दिलें. त्यानें त्याला सुखाचा एक प्यालाहि नजर केला आणि सांगितलें :

“ जोंपर्यंत तुला भूतकाळाचा पूर्ण विसर पडणार नाहीं आणि भविष्यकाळाच्या बाबतींत तूं अगदीं बेपर्वा होणार नाहींस, तोंपर्यंत तूं हा प्याला आपल्या ओठांना लावूं नकोस. ”

त्यानें त्याला दुःखाचा प्यालाहि दिला आणि सांगितलें :

“ हें पी. म्हणजे तुला सुखाची सत्यस्थिति माहीत होईल. ”

नंतर परमेश्वरानें आत्म्यामध्यें संतोषाच्या पहिल्या निःश्वासासरशीं नष्ट होऊन जाणारें प्रेम निर्माण केलें, आणि उद्धटपणाच्या पहिल्या शब्दासरशीं पळून जाणारें माधुर्य निर्माण केलें.

त्यानें त्याला सत्याचा मार्ग दाखविण्यासाठीं आकाशरूपी खूण निर्माण केली.

आणि त्याच्या हृदयाच्या गाभाऱ्यांत अदृश्याला पाहूं शकेल अशी दिव्यदृष्टि ठेवून दिली.

त्यानें काल्पनिक दृश्यें आणि चंचल आकृती यांच्याबरोबर नदीप्रमाणें वाहत राहावें म्हणून त्यानें त्याच्या ठिकाणीं कल्पनाशक्ति निर्माण केली.

देवदूतांनीं इंद्रधनुष्यापासून विणून तयार केलेलीं अभिलाषांचीं वस्त्रें त्यानें त्याला घातलीं.

प्रकाशाची छाया असलेला स्तिमितपणाचा एक अंधकारहि त्यानें आत्म्यामध्यें निर्माण केला.

नंतर ईश्वरानें क्रोधाच्या भट्टींतील आग व अज्ञानाच्या वाळवंटांतून वाहणारा वारा घेतला.

आणि अहंभावाच्या किनाऱ्यावरील वाळू गोळा केली आणि त्यांत काळाच्या पायांखालची धूळ मिसळली व त्या-पासून मानवाचा पुतळा तयार केला.

भावनांच्या आवेशांत ज्वालेप्रमाणें उफाळून वर येणारी आणि वासनेच्यापुढें नांगी टाकणारी एक आंधळी शक्ति त्यानें माणसाला दिली.

मृत्यूची छाया असणारें जीवन ईश्वरानें त्याला दिलें आणि मग देवांचा देव हंसला नि रडला.

त्याला स्वतःलाच्च एका अमर्याद नि अनंत प्रेमाची प्रचीति आली.

अशा प्रकारें त्यानें मानव आणि त्याचा आत्मा यांना एकत्र जोडलें.



# साक्षात्कार

एकदां पुष्कळ रात्र झाली आणि निद्रादेवीनें आपलें पांघरूण सर्व जगावर घातलें. अशा वेळीं मी आपल्या अंथरुणावरून उठलों आणि समुद्राकडे जात मनाशीं म्हणालों,

"समुद्र कधीं निजत नाहीं. आणि त्याची जागृति निद्राहीन व्याकुळ जीवांचें सांत्वन करते."

मी किनाऱ्यावर जाऊन पोहोंचलों.

त्यापूर्वींच पर्वतांच्या शिखरांवरून धुकें खालीं उतरलें होतें.

आणि बुरख्यामुळें एखाद्या कुमारिकेचा चेहरा शोभिवंत दिसूं लागावा त्याप्रमाणें त्यानें साऱ्या जगाला अवगुंठित करून सुंदर बनविलें होतें.

मी तेथें उभा राहून लाटांचें दृश्य पाहूं लागलों.

त्यांचीं गाणीं ऐकूं लागलों,

आणि त्यांच्यामागें असलेल्या शक्तीसंबंधीं विचार करूं लागलों.

ती शक्ति वादळांबरोबर प्रवास करते.

ज्वालामुखी पर्वताच्या द्वारें प्रक्षोभ प्रकट करते.

हंसऱ्या फुलांच्याबरोबर हंसते.

आणि गुणगुणणाऱ्या ओढ्यांबरोबर गाते.

कांहीं वेळानंतर मीं मान वळवून पाहिलें तों—

जवळच्या एका शिळेवर तीन आकृती बसलेल्या मला दिसल्या.

त्यांना धुक्यानें आपल्या पदराखालीं झांकून घेतलें होतें.

तरी पण त्या माझ्या दृष्टीपासून पूर्णपणें लपलेल्या नव्हत्या. जिच्यावर त्या आकृती बसलेल्या होत्या त्या शिळेकडे एका अज्ञात आकर्षणामुळें मी ओढला गेलों. कांहीं पावलें दूर उभें राहून मीं त्या आकृतींवर आपले डोळे रोखले. कारण त्या स्थानामध्यें एक अजब जादू भरलेली होती. त्या जादूमुळें माझी बुद्धि थिजून गेली आणि माझी कल्पनाशक्ति खडबडून जागी झाली.

त्यांच्यापैकीं एकजण उठला.

आणि समुद्राच्या पोटांतून वर येणाऱ्या निनादाप्रमाणें भासणाऱ्या आवाजांत म्हणाला :

" प्रेमाशिवाय जीवन म्हणजे फुलें अथवा फळें नसणारें झाडच होय.

सौंदर्याशिवाय प्रेम म्हणजे सुवास नसणारें फूल आणि बीज नसलेलें फळच होय.

जीवन, प्रेम आणि सौंदर्य हे एकाच आत्म्याचे तीन घटक आहेत—

स्वतंत्र आणि अमर्याद.

ते कधीं बदलत नाहींत किंवा एकमेकांपासून वेगळेहि होत नाहींत. "

इतकें बोलून तो परत आपल्या जागेवर बसला.

नंतर दुसरा उठला.

आणि लाटांच्या गर्जनेसारख्या स्वरांत म्हणाला,

" क्रान्तीशिवाय जीवन म्हणजे वसन्ताशिवाय ऋतु-समुदाय होय. सत्याशिवाय क्रान्ति म्हणजे ओसाड व शुद्ध वाळवंटांतून वाहणारा झरा होय. जीवन, क्रान्ति आणि सत्य हे एकाच आत्म्याचे तीन घटक आहेत.

ते कधीं बदलत नाहींत किंवा एकमेकांपासून वेगळेहि होत नाहींत."

इतकें बोलून तो आपल्या जागेवर बसला.

नंतर तिसरा उठला.

आणि बिजलीच्या कडकडाटासारख्या आवाजांत म्हणाला,

"स्वातंत्र्याशिवाय जीवन म्हणजे आत्म्याशिवाय शरीर होय. ज्ञानाशिवाय स्वातंत्र्य म्हणजे एक गोंधळलेला जीव होय. जीवन, स्वातंत्र्य आणि ज्ञान हे एकाच आत्म्याचे तीन घटक आहेत.

ते कधीं नाहींसे होत नाहींत अथवा निघून जात नाहींत."

नंतर ते तिघेहि उठले,

आणि अत्यंत रुबाबदारपणें व अधिकारयुक्त वाणीनें उद्गारले,

" प्रेम आणि त्यापासून जें कांहीं निघतें,
क्रान्ति आणि तिच्यापासून जें कांहीं उत्पन्न होतें,
स्वातंत्र्य आणि त्यायोगें जें कांहीं उजेडांत येतें,
तीं सारीं परमेश्वराचीं स्वरूपें आहेत.

आणि परमेश्वर हा सान्त व चेतन विश्वाचा अनन्त आत्मा आहे."

यानंतर स्तब्धता पसरली.

ती स्तब्धता अदृश्य पंखांची हालचाल आणि वायुमय शरीरांचें कंपन यांनीं भरलेली होती.

मीं आपले डोळे झांकून घेतले.

आणि नुकत्याच कानीं पडलेल्या आवाजाचे प्रतिध्वनी ऐकूं लागलों.

नंतर मीं डोळे उघडले.

तेव्हां धुक्याच्या प्रावरणांत दडलेल्या समुद्राव्यतिरिक्त मला अन्य कांहींच दिसलें नाहीं.

मी त्या शिळेच्या जास्त जवळ गेलों. परंतु आकाशाच्या दिशेनें वर जाणाऱ्या सुगंधी धुराच्या स्तंभांव्यतिरिक्त मला दुसरें कांहींच दिसलें नाहीं.



# मृतांच्या नगरींत

कालचीच गोष्ट.

मी शहराच्या गोंगाटांतून निसटलों आणि शांत शेतांमध्यें फिरावयास गेलों. मी एका उंच टेकडीजवळ जाऊन पोहोंचलों. त्या ठिकाणीं निसर्गानें आपली संपत्ति अत्यंत उदारपणें उधळलेली होती.

मी टेकडीवर चढलों आणि वळून शहराकडे पाहिलें. सगळे मनोरे आणि उपासनागृहें यांच्यासमवेत सारें शहर भट्ट्यांतून आणि कारखान्यांतून वर निघणाऱ्या धुराच्या घनदाट मेघांनीं आच्छादलेलें होतें.

मी बसलों आणि मानवाच्या उद्योगाविषयीं दुरून विचार करूं लागलों. मानवाची ही सगळी धडपड व्यर्थ नि निष्फळ आहे असें मला भासलें.

मीं आपलें लक्ष आदमाच्या ( आदिमानवाच्या ) पुत्रांनीं तयार केलेल्या सर्व गोष्टींतून मनापासून काढून घेतलें आणि परमेश्वराच्या वैभवाचें सिंहासन असलेल्या त्या शेतांकडे नजर टाकली.

त्या शेतांमध्यें मला एक कब्रस्तान दिसलें. त्या ठिकाणीं उत्तमोत्तम स्मशानलेख कोरलेले सुंदर संगमरवरी दगड रोवलेले होते आणि सुरूचीं उंच उंच झाडें उगवलेलीं होतीं.

जिवंत माणसांची नगरी आणि मृतांची नगरी यांच्या

दरम्यान बसल्या बसल्या जीवनांतील अखंड कलह व अनन्त गोंगाट आणि मृत्यूंतील सर्वव्यापी नीरवता व विशाल भव्यता यांसंबंधीं विचार करूं लागलों.

मला एका बाजूस आशा व निराशा, प्रेम व घृणा, श्रीमंती व गरिबी, विश्वास व अविश्वास हीं दिसलीं आणि दुसऱ्या बाजूस जिच्यांतून रात्रीच्या प्रगाढ शांततेमध्यें लहानाचीं मोठीं होणारीं हिरवींगार व सुंदर रोपटीं निसर्ग निर्माण करतो अशी माती मातींत मिसळत असलेली मीं पाहिली.

मी याप्रमाणें विचार करीत असतां माणसांचा एक मोठा समुदाय हळूहळू चालत असलेला माझ्या दृष्टीस पडला आणि आपल्या विषण्ण सुरांनीं सारें वातावरण भरून टाकणारें संगीत माझ्या कानीं आलें.

लहान-मोठ्या मानवांचा एक समूह माझ्या दृष्टीसमोरून गेला. त्यांनीं एका मोठ्या धनाढ्य व सत्ताधीश माणसाची शवपेटी खांद्यावर घेतलेली होती. जिवंत मानव मृताचे अनुसरण करीत होते. ते मोठमोठ्यानें रडत व ओरडत होते. त्यांचा आक्रोश व विलाप सबंध दिवसभर चालला होता आणि ते कबरस्तानीं पोहोंचेपर्यंत तो चालूच होता.

त्या ठिकाणीं पाद्यांनीं त्याच्यासाठीं प्रार्थना केली, धूप ओवाळला, वाजंत्र्यांनीं करुणापूर्ण स्वरांत विलापगीतें वाजविलीं, वक्त्यांनीं मृताची तारीफ करणारीं शब्दबंबाळ भाषणें केलीं, कवींनीं उभे राहून आपल्या कृत्रिम कवितांनीं शोक व्यक्त केला आणि तो कंटाळवाणा कार्यक्रम एकदांचा संपला.

नंतर तो जनसमुदाय पांगला तेव्हां मला त्या ठिकाणीं त्यांनीं एक सुंदर स्मशानलेख ठेवलेला दिसला. शिल्पकारांनीं तो स्मशानलेख मोठ्या अहमहमिकेनें खोदलेला होता. त्यावर निष्णात माळ्यांनीं तयार केलेले फुलांचे असंख्य हार-तुरे पडलेले होते.

अखेर तो समुदाय शहराकडे परत गेला आणि मी त्यांना दूर जात असलेले पाहून खोल विचारांत गढून गेलों.

आतां सूर्य पश्चिमेकडे अस्तास चालला होता. शिळांच्या व झाडांच्या सांवल्या लांब होऊं लागल्या होत्या. आणि त्या आपले प्रकाशाचे कपडे काढून टाकूं लागल्या होत्या.

या वेळीं मीं मान वर करून पाहिलें. मला दोन माणसें दिसलीं. त्यांनीं आपल्या खांद्यावर एक मामुली शवपेटी घेतलेली होती. आणि त्यांच्या मागोमाग एक बाई फाटके-तुटके कपडे घालून चालली होती. तिच्या छातीशीं एक लहान मूल बिलगलेलें होतें आणि तिच्या पायाशीं एक कुत्रें होतें. तें कधीं त्या बाईकडे तर कधीं खांद्यावरील शवपेटी-कडे पाहात होतें.

त्या गरीब व दीन माणसाच्या शवपेटीबरोबर इतकेच लोक होते.

जिचे मूक अश्रु तिच्या आंतरिक दुःखाची साक्ष देत होते अशी बायको.

आपली आई रडत आहे एवढ्यासाठींच ओरडणारें एक मूल.

आणि निमूटपणें व व्यथित अंतःकरणानें मागोमाग जाणारें एक इमानी जनावर.

अखेर हे लोक कबरस्तानांत पोहोंचले. त्यांनीं संगमरवरी थडग्यापासून दूर असलेल्या कोपऱ्यांतील एका खड्डयांत तें प्रेत पुरलें आणि अत्यंत निःशब्दपणें व व्यथित अंतःकरणानें ते परत फिरले.

कुत्र्याची नजर पुनः पुनः आपला साथी व मालक असलेल्या त्या माणसाच्या शेवटच्या विश्रांतिस्थानाकडे वळत होती. अखेर ते सर्वजण झाडांच्या मागें जाऊन दिसेनासे झाले.

हें पाहून मीं आपली दृष्टि प्रथम जिवंत माणसाच्या शहराकडे वळविली आणि म्हणालों,

" हें सर्व श्रीमंत व सत्ताधीश लोकांसाठीं आहे."

आणि नंतर त्या मृतांच्या नगरीकडे पाहून म्हणालों,

" आणि हें देखील श्रीमंत व सत्ताधीश लोकांसाठींच आहे. "

आणि मग मी ओरडून म्हणालों,

" हे परमेश्वरा, तुझ्या दीनदुबळ्या व गरीब सेवकांनीं कुठें जावें? "

इतकें बोलून मीं आकाशाकडे दृष्टि वळविली. त्या वेळीं तें आकाश महान् सूर्याच्या सोनेरी किरणांनीं झळकणाऱ्या ढगांनीं व्याप्त झालें होतें.

आणि मला आपल्या अंतःकरणांतून असा आवाज ऐकूं आला कीं,

" तिथें ! तिथें ! ! "

## माझा वाढदिवस

ज्या दिवशीं माझ्या मातेनें मला जन्म दिला,
त्या दिवशीं
बरोबर पंचवीस वर्षांपूर्वीं
नीरवतेनें मला युद्ध व धुमश्चक्री यांनीं भरलेल्या जीवनाच्या विशाल हातीं सोंपविलें.

पाहा,
मीं पंचवीस वेळां सूर्याच्या भोंवतीं प्रदक्षिणा घातल्या,
परंतु चंद्रानें माझ्या भोंवतीं किती वेळां फेऱ्या घातल्या हें मात्र मला माहीत नाहीं. आणि मला अजूनहि प्रकाशाचीं रहस्यें उमगलेलीं नाहींत हें मला माहीत आहे.
तसेंच, अंधाराचीं रहस्येंहि मला उलगडलेलीं नाहींत.
मी पंचवीस वेळां जमीन, चंद्र, सूर्य व तारे यांच्याबरोबर विश्वाभोंवतीं फिरलों आहें.

पाहा,
ज्याप्रमाणें समुद्राच्या उसळणाऱ्या लाटांच्या आवाजानें दरींखोरीं दुमदुमतात, अगदीं त्याप्रमाणेंच आतां माझा आत्मा विश्वसंस्थांचीं नांवें गुणगुणतो. कारण आत्मा हा विश्वाच्या हृदयामध्यें एक प्रवाह बनून वाहात असतो. परंतु त्याला स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव नसते. तो मंद्र आणि पंचम स्वरांत आपला विश्वाचा छंद गातो. परंतु त्याच्या स्वरांत अद्यापि संपूर्ण संवादित्व आलेलें नाहीं.

पंचवीस वर्षांपूर्वीं युगमातेनें माझें नांव या विचित्र आणि भयंकर जीवनाच्या वहींत लिहून ठेवलें.

पाहा,

मी फक्त एक शब्द आहें.

तो क्षणांत कांहींहि सूचित करीत नाहीं,

तर क्षणांत सर्व कांहीं सूचित करतो.

दरसाल या दिवशीं माझ्या अंतःकरणांत कोणकोणते विचार आणि कसल्या कसल्या आठवणी गोळा होतात !

गेलेल्या दिवसांची मिरवणूक आणि रात्रींच्या काल्पनिक दृश्यांची वरात हीं माझ्यासमोर येऊन थबकतात. नंतर ज्याप्रमाणें क्षितिजावरील ढगांना वारा उडवून घेऊन जातो त्याप्रमाणें तीं नाहींशीं होतात.

ज्याप्रमाणें नदी-नाल्यांचीं गीतें निःशब्द नि दूरदूरच्या दऱ्याखोऱ्यांतून विरून जातात, त्याप्रमाणें ती मिरवणूक आणि ती वरात हीं माझ्या घराच्या अंधारांत लुप्त होऊन जातात.

या दिवशीं दरसाल ज्या देवतांनीं माझा आत्मा घडविला आहे, त्या मला जगाच्या दूरदूरच्या कोनाकोपऱ्यांतून शोधावयास येतात. आणि दुःखपूर्ण आठवणींचीं मंदमंद गाणीं गातात आणि मग ज्याप्रमाणें धान्याच्या खळ्यावर पक्षी आशेनें उतरतात, परंतु तेथें एकहि कण न मिळाल्यामुळें थोडा वेळ घिरट्या घालून धान्याच्या शोधार्थ पंख फडफडवीत दुसऱ्या एखाद्या ठिकाणाकडे निघून जातात, त्याप्रमाणें त्या देवता आपले चेहरे या जीवनाच्या आभासामागें लपविण्यासाठीं उडून जातात.

या दिवशीं नेहमींच माझ्या भूतकालीन जीवनांतील घटनांचे अर्थ पुसट आरशाप्रमाणें येऊन उभे राहतात. त्यांच्याकडे मी थोडा वेळ टक लावून पाहतों. परंतु मला रात्र व दिवस यांच्या फिक्कट व निर्जीव चेहऱ्यांव्यतिरिक्त अन्य कांहींच दिसत नाहीं आणि फार पूर्वी नष्ट झालेल्या आशांच्या व स्वप्नांच्या सुरकुतलेल्या आणि म्हाताऱ्या चेहऱ्यांशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं.

मी पुन्हां त्या आरशांकडे दृष्टिक्षेप करतों आणि त्यांत माझा स्वतःचा निश्चल चेहरा पाहतों. परंतु मला उदासीनते-शिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. मी त्या उदासीनतेला प्रश्न विचारतों. परंतु ती कांहींच बोलत नाहीं असें मला दिसून येतें.

तरी पण मला असें वाटतें कीं, जर तिला बोलतां आलें असतें तर तिनें आनंदापेक्षांहि अधिक मधुर शब्द उच्चारला असता.

गेलीं पंचवीस वर्षे मीं पुष्कळ प्रेम केलें आहे आणि पुष्कळ वेळां इतर लोक ज्या वस्तूंचा तिरस्कार करतात अशाच वस्तूंवर मीं प्रेम केलें आहे. तरी पण लहानपणीं मला ज्या वस्तू आवडत असत त्या मला आजहि आवडतात आणि आज मला ज्या वस्तू आवडत आहेत, त्यांच्यावर मी जिवांत जीव असेपर्यंत प्रेम करीन, कारण प्रेम हेंच माझें सर्वस्व आहे आणि कोणीहि तें मजपासून हिरावून घेऊं शकणार नाहीं.

मीं पुष्कळ वेळां मृत्यूवरहि प्रेम केलें आहे आणि त्याला लाडक्या नांवांनीं पुकारलें आहे. आणि एकान्तांत व जाहीरपणें प्रेमळ शब्दांनीं त्याच्यासंबंधीं बोललों आहे. मृत्यूशीं झालेल्या

एकनिष्ठतेच्या आणाभाकांचा जरी मला विसरहि पडलेला नाहीं अथवा मीं त्या मोडल्याहि नाहींत, तरी पण मी जीवनावरहि प्रेम करावयास शिकलों आहे. कारण मरण आणि जीवन हीं माझ्या दृष्टीनें सौंदर्य आणि आनंद यांच्या बाबतींत समान आहेत. माझ्या आशा व आकांक्षांच्या संवर्धनामध्यें त्यांचा समान वांटा आहे आणि माझ्या प्रेमाची व कोमलतेची त्यांनीं आपसांत सारखी वांटणी करून घेतली आहे.

जीवन आणि मरण यांच्याप्रमाणेंच मीं स्वातंत्र्यावरहि प्रेम केलें आहे. आणि जसजसें माझें प्रेम वाढत गेलें तसतसें जुलूम आणि तिरस्कार यांच्या गुलामगिरींत मानव कसा पिचत आहे, यासंबंधीचें माझें ज्ञानहि वाढूं लागलें.

फार प्राचीन काळीं कोरल्या गेलेल्या, अज्ञानामध्यें पूर्णतेस पोहोंचलेल्या आणि गुलामांच्या ओठांनी घासूनपुसून चकचकीत झालेल्या पुतळ्यांना ते लोक शरण जात असलेले मीं पाहिले, परंतु तरीहि स्वातंत्र्याविषयीं मला जितकें प्रेम वाटत होतें. तितकेंच त्या गुलामांविषयींहि वाटत राहिलें आणि मी त्यांच्याकडे दयेच्या दृष्टीनें पाहात राहिलों. कारण ते आंधळे आहेत. ते गलिच्छ व रक्तपिपासू जनावरांच्या जबड्यांचें चुंबन घेतात, पण तें त्यांना दिसतहि नाहीं. ते विषारी नागांचें जहर चोखून घेतात, पण त्याची त्यांना कल्पनाहि येत नाहीं. ते स्वतःच्या हातांनींच आपलीं थडगीं खोदतात, पण तें त्यांच्या ध्यानांतहि येत नाहीं.

इतर कोणत्याहि वस्तूपेक्षां मीं स्वातंत्र्यावर जास्त प्रेम केलें आहे. कारण माझ्या दृष्टीनें स्वतंत्रता ही एक अशी कुमारिका

आहे कीं, जी हालअपेष्टा आणि एकलकोंडेपणा यांमुळें इतकी खंगून गेलेली असते कीं, ती निर्जन रस्त्यांतील घरांमध्यें वावरणाऱ्या एखाद्या भुताप्रमाणें बनून जाते आणि जेव्हां ती येणाऱ्या-जाणाऱ्या लोकांना हांका मारते तेव्हां ते तिचें ओरडणें ऐकतहि नाहींत अथवा तिच्याकडे डोळे वर करून नुसतें पाहातहि नाहींत.

या पंचवीस वर्षांमध्यें इतर सर्व लोकांप्रमाणें मींहि सुखावर प्रेम केलें आहे. त्यांच्याप्रमाणेंच मी देखील दररोज पहांटे उठून सुखाचा शोध करण्यास शिकलों आहें. परंतु त्यांच्या मार्गांमध्यें मला तें सुख आढळलें नाहीं अथवा त्यांच्या हवेल्यांजवळील वाळूवर त्या सुखांचीं पावलें उमटलेलींहि मला दिसलीं नाहींत; किंवा त्यांच्या प्रार्थनागृहांच्या खिडक्यांतून बाहेर पडणारा सुखाच्या मधुर गीताचा प्रतिध्वनिहि माझ्या कानीं पडला नाहीं.

त्याला हस्तगत करण्यासाठीं मीं खूप खूप शोधलें.

माझा आत्मा माझ्या कानांत असें म्हणत असल्याचें मीं ऐकलें कीं,

" सुख ही एक कुमारिका आहे. ती हृदयाच्या बंदिखान्यांत जन्म घेते आणि तेथेंच लहानाची मोटी होते. ती त्या तुरुंगाच्या तटांबाहेर कधींच येत नाहीं. "

तरी पण मीं तिचा शोध करण्यासाठीं माझ्या अंतः-करणाचा दरवाजा उघडला, तेव्हां मला त्या ठिकाणीं तिचा आरसा, तिचें अंथरूण आणि तिचे कपडे दिसले; परंतु स्वतः तिचें मात्र कसलेंच चिन्ह मला त्या ठिकाणीं आढळलें नाहीं.

मीं मानवजातीवर प्रेम केलें आहे.

होय, मीं माणसांवर खूप प्रेम केलें आहे.

आणि माझ्या मतें माणसांचे तीन प्रकार आहेतः—

जे जीवनाला शिव्याशाप देतात त्यांचा पहिला प्रकार,

जे जीवनावर अत्यंत खूष असतात त्यांचा दुसरा प्रकार,

आणि जे जीवनासंबंधीं मनन करितात त्यांचा तिसरा प्रकार.

पहिल्या प्रकारच्या माणसांवर त्यांच्या दुःखपूर्ण स्थितीबद्दल,

दुसऱ्या प्रकारच्या माणसांवर त्यांच्या भलेपणाबद्दल,

आणि तिसऱ्या प्रकारच्या माणसावर त्यांच्या शहाणपणाबद्दल प्रेम केलें आहे.

अशा प्रकारें माझ्या आयुष्याचीं पंचवीस वर्षें निघून गेलीं. आणि अशा प्रकारें हिवाळ्यांतील वादळी वाऱ्यामुळें झाडांचीं वाळलेलीं पानें कुठल्या कुठें उडून जातात, त्याप्रमाणें माझे दिवस आणि रात्री माझ्या जीवनाच्या मार्गावरून एकमेकांचा पाठलाग करीत राहिले. आणि ज्याप्रमाणें पर्वतावर चढणारा थकला–भागलेला प्रवासी शिखरापासून निम्म्या अंतरावर जाऊन पोहोंचल्यानंतर थांबतो आणि मागें वळून पाहातो त्याप्रमाणें मी आज मागील आठवणी काढीत थोडा वेळ थांबतो आणि माझ्या डाव्या, उजव्या व मागच्या बाजूस पाहतों. परंतु मला कुठेंहि असा एखादा खजिना दिसत नाहीं कीं, ज्याच्याविषयीं मी हक्कानें सांगू शकेन कीं, ‘ हा माझा स्वतःचा आहे. ’

ज्यांच्यावर मी काळ्या शाईनें खाणाखुणा करतों असे पांढरे शुभ्र कागदाचे तुकडे आणि ज्यांच्यावर सुसंवादी अथवा विसंवादी रेघोट्या ओढतों व रंग भरतों असे विचित्र व अर्धवट कॅनव्हासचे तुकडे यांच्याव्यतिरिक्त माझ्या वर्षांच्या ऋतूंमध्यें दुसरें कसलेंहि पीक मला आढळत नाहीं. ज्याप्रमाणें एखादा शेतकरी सऱ्यांमध्यें बीं पेरण्यासाठीं शेताकडे जातो आणि संध्याकाळच्या वेळीं आशा व प्रतीक्षा करीत घराकडे परत येतो, त्याप्रमाणें मीं माझ्या कागदांच्या व कॅनव्हासांच्या खाणाखुणा, रेघोट्या व रंग यांमध्यें माझ्या कल्पनेंतील आणि स्वप्नांतील सौंदर्य व स्वातंत्र्य गाडून व पुरून टाकलें आहे. परंतु मीं माझ्या हृदयाचीं बीजें व्यवस्थितपणें पेरलेलीं असलीं तरी मीं कसल्याहि प्रकारची आशा बाळगलेली नाहीं अथवा प्रतीक्षा केलेली नाहीं. आणि आतां मी माझ्या जीवनाच्या अशा मोसमापर्यंत येऊन ठेपलों आहें कीं, ज्या वेळीं मला भूतकाळ हा उसासे व दुःखें यांच्या धुक्याआड दडल्यासारखा दिसत आहे आणि भविष्यकाळ हा भूतकाळाच्या पडद्यामधून प्रकट होत आहे.

मी माझ्या लहानशा खिडकीजवळ उभा राहून जीवनाकडे दृष्टिक्षेप करतों. मी लोकांचे चेहरे पाहतों आणि त्यांच्या आरोळ्या गगनाला भिडत असलेल्या ऐकतों.

घरांच्या रस्त्यांतून पडणाऱ्या त्यांच्या पावलांची चाहूल मला ऐकूं येते आणि त्यांच्या आत्म्यांचें मीलन, त्यांच्या अभिलाषांची उत्कटता व त्यांच्या हृदयांतील कळवळा मला समजतो.

मी थांबतों आणि लहान मुलें खदखदां हंसत व जोर-जोरानें ओरडत एकमेकांवर धूळ उडवीत असलेलीं पाहतों. मुलगे आपल्या माना वर करून पहात असलेले मला दिसतात. जणूं सूर्याच्या चकचकीत किनारीनें मढविलेल्या ढगाच्या समासांवर तरुणांना उद्देशून लिहिलेलें एखादें काव्यच ते वाचीत असतात!

यौवनानें मुसमुसलेल्या तरुणी झाडांच्या फांद्यांप्रमाणें इकडे तिकडे हेलकावे खात फुलांप्रमाणें हंसत आणि प्रेमाच्या व कोमल अभिलाषांच्या आधिक्यामुळें थरथरत तिरप्या नजरेनें तारुण्याच्या मस्तीत गुंग झालेल्या तरुणांकडे डोकावून पाहात असलेल्या माझ्या दृष्टीस पडतात.

म्हातारीं माणसें आपल्या काठीचा आधार घेऊन हळूहळू चालत असलेलीं मला दिसतात. त्यांच्या कंबरा अगदीं वाकून गेलेल्या असतात आणि त्यांची दृष्टि जमिनीवर खिळलेली असते. जणूं त्यांचे जुनाट व अंधुक डोळे माती-मध्यें हरवलेल्या चमकदार हिऱ्यांचा शोध करीत असतात!

मी माझ्या खिडकीशेजारीं उभा राहतों आणि शहरांतून शांतपणें हिंडणाऱ्या व सरपटणाऱ्या या सर्व आकारांकडे व सावल्यांकडे टक लावून पाहतों.

नंतर मी शहराच्या पलीकडील त्या निर्जन स्थानाकडे दृष्टि टाकतों आणि तेथील भेसूर सौंदर्य, आपल्याकडे बोलावणारी नीरवता, उंच उंच दरडी, लहान लहान दऱ्या, टवटवीत झाडें, सळसळणारें गवत, सुवासानें भरलेलीं फुलें, गुणगुणाऱ्या

नद्या, गाणारे जंगली पक्षी आणि गुंजारव करणारे सर्व सपक्ष प्राणी माझ्या दृष्टीस पडतात.

जेव्हां मी वैराण प्रदेशाच्या पलीकडे दृष्टिक्षेप करतों, तेव्हां सखोल आश्चर्यें, थक्क करून सोडणारीं रहस्यें आणि दडलेले खजिने यांनीं भरलेला सागर माझ्या दृष्टीस पडतो. खवळलेल्या, उसळणाऱ्या व फेसाळणाऱ्या समुद्रावर दिसणारीं सगळीं चिन्हें मला त्या सागराच्या चेहऱ्यावर दिसतात. आणि त्याच्या पृष्ठभागावर उडणारे तुषार व खालीं उतरणारे बाष्पमेघ मी पाहतों.

जेव्हां मी समुद्राच्या पलीकडे मान वर करून पाहतों तेव्हां स्थलाची अमर्याद विशालता, गतिमान् जगें, आकाशस्थ तारकांचे चमचमणारे पुंजके; सूर्य, चंद्र आणि चल व अचल ग्रह—तारे आणि उल्का माझ्या दृष्टीस पडतात. आणि मग ज्या शक्ती एकमेकांना आकर्षित करतात अथवा दूर लोटतात त्यांच्या खुणा मला दिसूं लागतात. ज्याला आदि नाहीं अथवा अंत नाहीं अशा एका विश्वव्यापी नियमाच्या साखळीमध्यें जखडल्या गेलेल्या व सतत सृजन नि परिवर्तन करणाऱ्या पंचमहाभूतांचीं युद्धें मी पाहतों.

या सर्व गोष्टी मी माझ्या लहानशा खिडकीमधून पाहतों आणि आपल्या आयुष्याच्या मागील पंचवीस वर्षांचा मला विसर पडतो आणि त्यापूर्वीचीं अनंत शतकें व त्यानंतरचीं अनंत युगें दोहोंनाहि मी विसरून जातों.

तेव्हां माझें जीवन स्वतःचीं सर्व रहस्यें आणि सत्यें यांच्या समवेत अनंत सखोलता व उच्चता यांच्या पोकळी-

मध्यें थरथर कांपणाऱ्या एखाद्या लहान मुलाच्या स्फुंदण्या-सारखें वाटतें.

परंतु हा अणु, हें अस्तित्व, ज्याला मी ‘ अहम् ’ असें म्हणतों, तें प्रतिक्षणीं प्रक्षोभ व गोंगाट माजवीत असतें. तें आपले पंख आकाशाच्या विशाल विस्ताराला नेऊन भिडवितें आणि आपले हात जगाच्या कोनाकोपऱ्यापर्यंत पसरवितें. ज्यानें त्याला ज्ञानयुक्त जीवन दिलें, त्या काळाच्या टोंकावर तें लोंबकळत उभें आहे.

आणि मग ज्या ठिकाणीं ही जिवंत ठिणगी वास करीत आहे अशा त्या पवित्र प्रदेशाच्या वातावरणांतून एक आवाज मोठ्यानें ओरडून असें सांगतो कीं—

हे जीवना ! तुला शांति मिळो.

हे जाग्रतावस्थे ! तुला शांति मिळो.

हे साक्षात्कारा ! तुला शांति लाभो.

ज्याच्या अनंत प्रकाशानें विश्वाच्या अंधाराला घेरून टाकलें आहे अशा हे दिवसा, तुला शांति मिळो.

जिच्या काळोखामुळें आकाशांतील प्रकाशाचें दर्शन घडतें अशा हे रात्री, तुला शांति मिळो.

हे ऋतूंनो ! तुम्हांला शांतता लाभो.

भूमीला नूतन तारुण्य देणाऱ्या हे वसंतऋतो ! तुला शांति मिळो.

हे ग्रीष्मऋतो ! तुला शांति लाभो. कारण तूं सूर्याच्या वैभवामध्यें वृद्धि करतोस.

मेहनतीचीं फळें आणि श्रमाचीं पिकें देणाऱ्या हे शरद्-ऋतो ! तुला शांति मिळो.

हे शिशिरऋतो ! तुला शांतता लाभो. कारण तूं वादळाच्या योगें निसर्गाच्या नष्ट झालेल्या शक्तीला पुन्हां जिवंत करतोस.

हे वर्षांनो ! तुम्हांला शांति लाभो, कारण तुम्ही रात्र आणि दिवस यांचे लपलेले खजिने उघडे करून दाखवितां.

हे युगांनो ! तुम्हांला शांतता लाभो, कारण भूतकाळानें ज्या वस्तूंचा नाश केला आहे त्यांना तुम्ही पुन्हां जिवंत करतां.

हे काळा ! तुला शांति मिळो, कारण तूं आमच्याबरोबर त्या पूर्ण दिवसाकडे येत आहेस.

हे आत्म्या ! तुला शांति लाभो, कारण जीवनाचा जो लगाम सूर्य आमच्या डोळ्यांपासून लपवून ठेवतो तो तूं मोठ्या शहाणपणानें धरून ठेवतोस.

हे हृदया ! तुला शांति मिळो, कारण तूं स्वतः अश्रूंमध्यें न्हाऊन निघत असतांहि शांततेचा जयजयकार करतोस.

आणि हे ओठांनो ! तुम्हांला शांतता लाभो, कारण तुम्ही कडवटपणाची भाकरी चाखत असतांहि शांतीचा जप करतां.

[ पॅरिसमध्यें चित्रकलेचा अभ्यास करीत असतां.
ता. ६ जानेवारी १९०८ ]

## रात्र

हे रात्री ! कवि, प्रेमी आणि गायक यांचें तूं चिरंतन स्थान आहेस.

हे रजनी ! तुझ्या ठिकाणीं आत्मे व स्वप्नें यांच्याबरोबर छायाहि निवास करतात.

हे यामिनी ! आमच्या अभिलाषा, वासना आणि स्मृती यांना तूं आपल्या कुशींत घेतेस.

हे त्रियामे ! सायंकाळचे टेंगू ढग आणि सकाळच्या नववधू यांच्यामध्यें दहशतीची तलवार कमरेला लटकावून, चंद्राचा मुकुट डोक्यावर ठेवून आणि निःशब्दतेचा पोषाख शरीरावर चढवून उभी असलेली, जीवनाच्या सखोलतेमध्यें हजारों डोळ्यांनीं डोकावणारी आणि विध्वंस व मृत्यु यांचे सुस्कारे हजारों कानांनीं ऐकणारी अशी तूं एक अवाढव्य राक्षशीण आहेस.

*

हे रात्री ! तुझा अंधारच आम्हांला आकाशांतील प्रकाशाचा साक्षात्कार घडवितो. कारण दिवसाच्या प्रकाशानें आम्हांला पृथ्वीच्या अंधकारांत गुरपटून टाकलें आहे.

तुझें वचनच आमच्या डोळ्यांना अनंताचें दर्शन घडवितें: कारण, दिवसाच्या पोकळ दिमाखानें आम्हांला काळ आणि स्थळ यांच्या दुनियेशीं आंधळ्या माणसाप्रमाणें जखडून ठेवलें आहे.

तुझी स्थिर शांतताच नेहमीं जागृत व अस्वस्थ राहणाऱ्या आत्म्यांचें रहस्य उलगडत असते. कारण दिवस हा एक दंगेखोर गलबला आहे. त्यामध्यें महत्त्वाकांक्षा आणि अभिलाषा यांच्या तीक्ष्ण टापांखालीं आत्मे दबले जातात.

हे रात्री ! झोपेच्या पदरामध्यें दुबळ्यांचीं स्वप्नें आणि बलवानांच्या आशा गोळा करणारा तूं एक मेंढपाळ आहेस.

आपल्या गूढ बोटांनीं दुर्दैवी जीवांचे डोळे झांकणारा आणि या जगाहून अधिक दयाळू जगांत त्यांच्या अंतःकरणांना घेऊन जाणारा तूं एक जादूगार आहेस.

तुझ्या भुरक्या रंगाच्या वस्त्रांच्या घड्यांमध्यें प्रेमीजनांना लतामंडपांतील एकान्त मिळाला आहे आणि स्वर्गीय दवबिंदूंनीं ओल्या झालेल्या तुझ्या चरणांवर विरहात्म्यांनीं अश्रू ढाळले आहेत.

आणि शेतांच्या व द्राक्षांच्या बागांच्या सुगंधानें सुवासित झालेल्या तुझ्या तळहातांमध्यें अनोळखी लोकांनीं आपल्या आशा व निराशा गाडून टाकल्या आहेत.

तूं प्रेमीजनांची सखी आहेस, एकाकी जीवांना समाधान देणारी आहेस आणि ज्यांचें जीवन वैराण झालें आहे, अशांचें आतिथ्य करणारी घरधनीण आहेस.

तुझ्या घनदाट छायेमध्यें कवीच्या कल्पना घुसळून निघतात, तुझ्या वक्षःस्थळावर द्रष्ट्याचें हृदय जागें होतें, तुझ्या

ललाटावर कल्पकता लेखन करते. कारण तूं कवीची हृदय-सम्राज्ञी आहेस, द्रष्ट्याची दिव्यदृष्टि आहेस आणि विचारकाची अंतःस्फूर्ति आहेस.

*

माझ्या आत्म्याला माणसांचा कंटाळा आला आणि माझे डोळे दिवसाच्या चेहऱ्याकडे पाहून पाहून थकून गेले, तेव्हां ज्या ठिकाणीं भूतकालीन युगांच्या सावल्या झोंपीं जातात अशा दूरदूरच्या शेतांकडे मी गेलों.

त्या ठिकाणीं मी एका काळोख्या व नीरव अस्तित्वासमोर उभा राहिलों. तें अस्तित्व हजारों पायांनीं पर्वत, दऱ्या आणि मैदानें यांवर संचार करीत होतें.

त्या ठिकाणीं मी अंधाराच्या डोळ्यांशीं डोळे भिडवून पाहूं लागलों आणि अदृश्य पंखांचा फडफडाट ऐकूं लागलों.

त्या ठिकाणीं मला असा भास झाला कीं, मी एका निराकार वस्त्राला स्पर्श करीत आहें आणि अदृश्य भयाच्या कल्पनेनें माझा थरकांप उडाला.

*

हे करुणगंभीर, रूपवती आणि भयानक रात्री ! त्या ठिकाणीं मीं तुला पाहिलें. तूं स्वर्ग आणि पृथ्वी यांच्यामध्यें उभी होतीस. तूं मेघांचीं वस्त्रें परिधान केलीं होतीस आणि धुक्याचा कमरपट्टा घातला होतास. तूं सूर्याच्या प्रकाशाला हंसत होतीस आणि दिवसाच्या श्रेष्ठत्वाची टर उडवीत होतीस. आपापल्या आराध्यदैवतांच्या मूर्तीसमोर झोंप देखील न घेतां

गुडघे टेकून बसणाऱ्या गुलामांच्या थव्याचा तूं उपहास करीत होतीस आणि आपल्या किनखापी व रेशमी गाद्यांवर गाढ झोपीं गेलेल्या व स्वप्नांमध्यें विहार करणाऱ्या राजांकडे तूं तिरस्कारानें पाहात होतीस. त्या ठिकाणीं तूं चोरांच्या डोळ्यांशीं डोळे भिडवीत होतीस आणि साखरझोपेंत गुंग झालेल्या बालकांवर तूं पहारा ठेवीत होतीस हें मीं पाहिलें आहे. वेश्यांचें खिदळणें पाहून तूं रडत होतीस आणि प्रेमी-जनांच्या अश्रूंकडे पाहून हंसत होतीस. आपल्या उजव्या हातानें विशाल अंतःकरणाच्या लोकांना तूं वर उचलीत होतीस आणि क्षुद्र मनाच्या लोकांना आपल्या पायाखालीं तुडवीत होतीस, हेंहि मीं पाहिलें.

*

हे रात्री ! त्या ठिकाणीं मीं तुला पाहिलें आणि तूं मला पाहिलेंस.

तूं आपल्या भयंकर सौंदर्यानें मला माझ्या पित्याप्रमाणें भासलीस आणि मी आपल्या स्वप्नांमध्यें गुंग झालेला तुझा मुलगा झालों होतों. कारण अस्तित्वाचे पडदे बाजूस सारले गेले होते आणि संशयाचा बुरखा फाडून टाकला गेला होता.

तूं आपलीं गुप्त रहस्यें माझ्याजवळ उघडीं केलींस आणि मीं तुला माझ्या सगळ्या आशा व आकांक्षा सांगून टाकल्या. आणि मग तुझ्या भव्यतेचें फुलांच्या नाजुक कुजबुजीहून अधिक सुंदर अशा स्वरमाधुरींत रूपांतर झालें. आणि माझ्या

आशंका नाहींशा होऊन त्यांची जागा पक्ष्यांच्या निष्ठेहूनहि अधिक दृढ अशा श्रद्धेनें घेतली.

तूं मला उचललेंस आणि आपल्या खांद्यावर बसविलेंस; आणि माझ्या डोळ्यांना पाहायला, माझ्या कानांना ऐकायला, माझ्या ओठांना बोलायला व माझ्या हृदयाला प्रेम करायला शिकविलेंस. तूं आपल्या जादूच्या बोटांनीं माझ्या कल्पनेला स्पर्श केलास आणि माझी कल्पना एखाद्या पूर आलेल्या नदीप्रमाणें गात गात व आपल्याबरोबर सगळा पाला-पाचोळा घेत घेत दुथडीं वाहूं लागली.

आणि तूं आपल्या ओठांनीं माझ्या आत्म्याचें चुंबन घेतलेंस. त्याबरोबर तो धडधडा पेटून प्रत्येक मृत व मरणोन्मुख वस्तु स्वाहा करूं लागला.

हे रात्री ! तुझ्याशीं एकरूप होईपर्यंत मीं तुझें अनुसरण केलें. तुझ्या इच्छा-आकांक्षा या माझ्या इच्छा-आकांक्षा होईपर्यंत मीं तुला साथ दिली. माझें संपूर्ण अस्तित्व ही तुझी स्वतःची एक लहानशी प्रतिमा बनेपर्यंत मीं तुजवर प्रेम केलें. माझ्या अंधाऱ्या व्यक्तिमत्त्वामध्यें धगधगणारे तारे तळपत आहेत. संध्याकाळच्या वेळीं माझ्या वासना त्या ताऱ्यांना विखरून टाकतात आणि सकाळच्या प्रहरीं शंका त्यांना गोळा करते. माझ्या अंतःकरणांत एक चन्द्र आहे, तो कधीं दाट ढगांशीं झगडतो, तर कधीं सर्व ठिकाणीं व्यापून राहिलेल्या स्वप्नांच्या मिरवणुकीशीं युद्ध खेळतो.

आतां माझ्या जागृत आत्म्यामध्यें एक शांति निवास

करीत आहे. ती शांति प्रेमीजनांचीं रहस्यें आणि उपासकांच्या प्रार्थना प्रकट करते. माझ्या शिरावर गूढतेचें एक आवरण पसरलेलें आहे. मृत्युसमयींच्या मर्मान्तिक वेदना हें आवरण फाडून टाकतील; परंतु तारुण्याचीं गीतें तें आवरण पुन्हां विणतील.

हे रात्री ! मी तुझ्यासारखाच आहें. आणि जर लोकांना असें वाटलें कीं, मी बढाईखोर आहें, तर मग ते स्वतःला दिवसाप्रमाणें समजण्यांत बढाई मारीत नाहींत काय ?

मी तुझ्यासारखाच आहें आणि तुझ्याप्रमाणेंच वस्तुतः ज्या गोष्टींशीं माझा कांहीं संबंध नाहीं, त्यांचा आरोप माझ्यावर केला जात आहे. माझीं सगळीं स्वप्नें, साऱ्या आशा आणि संपूर्ण अस्तित्व यांच्यासमवेत मी तुझ्यासारखा आहें. सायंकाळ आपल्या सोनेरी लोकरीचा राजमुकुट माझ्या शिरावर ठेवीत नसली तरी मी तुझ्यासारखाच आहें. मोत्यांनीं आणि गुलाबाच्या फुलांनीं सजविलेल्या छानदार पोषाखानें सकाळ मला भूषवीत नसली तरी मी तुझ्यासारखाच आहें. अद्यापि मला आकाशगंगेचा कमरपट्टा घालावयास मिळालेला नसला तरी मी तुझ्यासारखाच आहें.

माझ्या पायांत बेड्या पडलेल्या असल्या आणि मी बंडखोर असलों तरीसुद्धां मी एक विशाल आणि शांत अशी रात्रच आहें.

माझ्या काळोखाला आदि नाहीं आणि माझ्या सखोलतेला अंत नाहीं.

जेव्हां मृत व्यक्तींचे आत्मे आनंदाच्या प्रकाशाबद्दल स्वतः गर्व करण्यासाठीं म्हणून जागे होतील, तेव्हां माझा निशाप्रिय आत्मा आपल्या दुःखाच्या काळोखानें गौरवान्वित होऊन खालीं उतरेल.

हे रात्री ! मी तुझ्यासारखा आहें आणि जेव्हां माझी पहाट होईल तेव्हां तुझ्याप्रमाणेंच माझा अंत होईल.

( एप्रिल १९१३ )



## मंदिराच्या दारीं

प्रेमासंबंधीं मला बोलतां यावें म्हणून मीं आपले ओठ पवित्र अग्नीनें शुद्ध केले. परंतु मीं आपलें तोंड उघडलें, तेव्हां मी एक शब्दहि उच्चारूं शकलों नाहीं.

मी प्रेमाच्या बाबतींत अनभिज्ञ होतों, तेव्हां मला प्रेमाचीं गाणीं गात बसण्याची संवय होती. परंतु मला प्रेमाची प्रचीति आली, तेव्हां माझ्या तोंडांतील शब्द आंतल्या आंत विरून गेले व त्यांचा श्वासोच्छ्वास बनला; आणि माझ्या हृदयामध्यें खळबळ उडविणारीं गाणीं गंभीर नीरवतेंत बुडून गेलीं.

यापूर्वीं जर तुम्हीं मला प्रीतीचीं रहस्यें व गुपितें यांसंबंधीं प्रश्न केला असता, तर मीं तुम्हांला मोठ्या आत्मविश्वासानें त्याचें उत्तर दिलें असतें.

परंतु आतां प्रेमानें आपल्या वस्त्रप्रावरणांनीं मला भूषविलें आहे अशा वेळीं प्रेमाच्या पद्धती आणि त्याचीं रहस्यें यांच्या-संबंधीं तुमच्याकडे पृच्छा करण्यासाठीं मी तुमच्यासमोर आलों आहें.

तुमच्यामध्यें असा कोण आहे कीं जो माझ्या प्रश्नांचें उत्तर देईल ?

मी तुम्हांला माझ्या स्वतःसंबंधीं आणि माझ्या हृदयांत असलेल्या वस्तूंसंबंधीं विचारण्यासाठीं आलों आहें.

तुमच्यामध्यें असा कोण आहे कीं, जो माझ्या अंतःकरणा-

समोर माझें अंतःकरण उघडें करूं शकेल आणि माझ्या स्वतःसमोर मला स्वतःला प्रकट करूं शकेल ?

आतां मला असें सांगा कीं, जिनें माझी शक्ति नष्ट केली आहे आणि माझ्या आशा व आकांक्षा वितळून टाकल्या आहेत अशी ही कसली ज्वाला माझ्या उरांत पेटत आहे ?

जे माझ्या आत्म्याला एकलेपणाच्या वेळीं आपल्या मिठींत घेतात आणि माझ्या हृदयाच्या प्याल्यांत सुखाचा कडवटपणा आणि दुःखाचें माधुर्य यांचें संमिश्र मद्य ओततात, असे हे हळुवार व कोमल, लाडके व लोभस हात कुणाचे आहेत ?

रात्रीच्या असीम निःशब्दतेंत माझ्या बिछान्याभोंवतीं फडफडणारे हे विशाल पंख कुणाचे आहेत ? त्या पंखांच्या हालचालीमुळें मी रात्रभर जागत राहतों आणि कोण जाणे, कुणाची प्रतीक्षा करीत असतों.

जें मला ऐकूं येत नाहीं तें मी ऐकतों, जें मला दिसत नाहीं त्याच्याकडे मी टक लावून बसतों आणि ज्याचें आकलन मला होऊं शकत नाहीं त्याच्यासंबंधीं मी ध्यान व चिंतन करतों व जें मला मिळालेलें नाहीं तें प्राप्त करीत असतों.

होय, रात्र आहे; परंतु मला झोप येत नाहीं. मी लांब सुस्कारे सोडतों. कारण माझ्या बाबतींत सुस्कारे आणि विलाप हे आनंद आणि हास्य यांहून जास्त सुखदायक आहेत.

जी मला क्षणोक्षणीं ठार मारते आणि पुनः जिवंत करते अशा एका अज्ञात शक्तीच्या पकडींत मी सांपडलेला असतों. अखेर शेवटीं दिवस उगवतो आणि माझ्या घराचा

कोनाकोपरा प्रकाशानें भरून जातो. तोंपर्यंत हा खेळ चालूच असतो. नंतर मी झोपीं जातों. परंतु माझ्या दगडी बिछान्या-भोंवतीं एका स्वप्नाची आकृति घिरट्या घालीत असते.

तर मग जिला आपण प्रेम असें म्हणतों ती वस्तु काय आहे ?

मला असें सांगा कीं, आमच्या पडछायेसारख्या जीवनाच्या तळाशीं मानवी अस्तित्वाच्या हृदयांत व आत्म्यांत निवास करणारें हें गूढ रहस्य काय आहे ?

सर्व कारणांचा परिणाम आणि सर्व परिणामांचें कारण असलेलें विशाल स्वातंत्र्य तरी काय आहे ?

मृत्यु आणि जीवन यांना एकत्र करणारी व त्यांपासून जीवनाहूनहि अधिक आश्चर्यकारक आणि मृत्यूहूनहि अधिक गंभीर असें स्वप्न निर्माण करणारी ही शक्ति आहे तरी काय ?

माझ्या बंधूंनो, सांगा ! जेव्हां प्रेमाचीं शुभ्र बोटें तुमच्या आत्म्याला स्पर्श करतील, तेव्हां तुमच्यापैकीं असा कोण आहे कीं, जो जीवनाच्या अद्‌भुत झोपेंतून जागा होणार नाहीं ?

आपल्या प्रेयसीनें आपल्याला जवळ बोलविलें असतां जो आपले आईबाप आणि आपली मातृभूमि यांना रामराम ठोकणार नाहीं असा तुमच्यापैकीं कोण आहे ?

जिच्यासाठीं तुमचा आत्मा तळमळत आहे, अशा त्या प्रेयसीसाठीं वाळवटें ओलांडणार नाहीं, पर्वतांचीं शिखरें उल्लंघणार नाहीं आणि दर्यापार जाणार नाहीं असा तुमच्या-पैकीं कोण आहे ?

जिचा श्वास, स्वर आणि स्पर्श यांत 'माधुर्य व मादकता

भरलेली आहे अशी एक सुंदरी आपली प्रतीक्षा करीत आहे असें समजतांच कोणता तरुण जगाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत जाणार नाहीं ?

जो आपल्या नवसास पावणाऱ्या व मनोरथ पूर्ण करणाऱ्या देवतेच्या स्वर्गीय अग्नीमध्यें धूप म्हणून आपल्या आत्म्याचें हवन करणार नाहीं असा कोण आहे ?

कालचीच गोष्ट. मी एका मंदिराच्या दारांत उभा होतों. आणि प्रत्येक येणाऱ्या जाणाऱ्याला प्रेमाचीं रहस्यें व लाभ यांसंबंधीं प्रश्न विचारीत होतों.

एक मध्यम वयाचा गृहस्थ तेथून गेला. आपल्या कपाळाला आठ्या घालून तो म्हणाला,

" प्रेम हा एक जन्मजात दुबळेपणा आहे.

तो आपल्याला आदिमानवाकडून वारसा म्हणून मिळालेला आहे. "

नंतर एक धट्टाकट्टा व उंचापुरा जवान तेथून गेला. त्याच्या बाहूंमध्यें राक्षसासारखी ताकद होती. तो असें गुणगुणला,

" प्रेम हा एक निश्चय आहे.

तो आपल्या जीवनाला साथ देतो.

तो भूतकाळ नि भविष्यकाळ यांच्याशीं वर्तमानकाळाला निगडित करतो. "

नंतर एक दुःखी-कष्टी बाई उसासे टाकीत तेथून गेली. ती म्हणाली,

" प्रेम हें एक प्राणघातक विष आहे.

महाभयंकर साप तें नरकांतून या वातावरणांत ओकीत असतात.

तें दंवबिंदूंचें रूप धारण करून तहानलेल्या आत्म्यांवर वर्षतें आणि त्यायोगें ते आत्मे कांहीं काळपर्यंत झिंगल्यासारखे होतात आणि नंतर पुन्हां थोडा वेळ ते शुद्धीवर येऊन मग कायमचे नेस्तनाबूत होतात. "

परंतु गुलाबाच्या फुलासारखा सुंदर चेहरा असलेली एक तरुणी हंसत हंसत आली आणि म्हणाली,

" हें पाहा, प्रेम हें एक अमृत आहे.

प्रभातीच्या नववधू बलवान् पुरुषांसाठीं त्याचा वर्षाव करीत असतात.

कारण रात्रीच्या ताऱ्यांसमोर त्यांनीं गौरवानें मान ताठ करावी आणि दिवसाच्या सूर्यासमोर त्यांनीं आनंदी राहावें अशी त्यांची इच्छा असते. "

यानंतर आणखी एक माणूस आला. त्यानें काळ्या रंगाचा खिन्न पोशाख केलेला होता. आणि त्याची दाढी छातीवर रुळत होती. तो अत्यंत कठोर आवाजांत म्हणाला,

" प्रेम हा एक मूर्खपणा आहे.

तो तारुण्याच्या प्रातःकालाबरोबर येतो आणि संध्याकाळ होतांच निघून जातो. "

त्याच्या पाठोपाठ आणखी एक मनुष्य आला. त्याचा

चेहरा तेजस्वी व शांत होता. तो अत्यंत स्थिर चित्तानें व प्रसन्न मनानें म्हणाला,

✓ " प्रेम हें एक स्वर्गीय ज्ञान आहे.

देवांप्रमाणें आम्हीं एकूण एक गोष्टी पाहण्यास समर्थ व्हावें म्हणून तें आमच्या आंतरिक व बाह्य नेत्रांना जीवन देतें. "

नंतर एक आंधळा आपल्या हातांतील काठीनें जमीन चांचपडीत तेथें आला आणि विलाप करीत असल्यासारखा रडक्या सुरांत म्हणाला,

✓ " प्रेम हें एक दाट धुकें आहे.

तें आत्म्याला झांकोळून टाकतें आणि त्याच्या दृष्टीपासून जीवनाच्या दृश्यांना लपवितें.

यामुळें तो ( आत्मा ) खडकाळ सुळक्यांमध्यें दडलेल्या आपल्या अभिलाषांच्या सांवल्यांव्यतिरिक्त कांहीं पाहात नाहीं आणि विनाशाच्या व विध्वंसाच्या दऱ्याखोऱ्यांतून दुमदुमणाऱ्या आपल्या स्वतःच्या आवाजांत प्रतिध्वनिव्यतिरिक्त दुसरें कांहींहि ऐकत नाहीं. "

नंतर एक तरुण वीणा वाजवीत तेथून गेला. त्याच्या तोंडीं हें गीत होतें :

✓ " प्रेम हें एक स्वर्गीय तेज आहे.

तें संवेदनशील अंतःकरणांतून निघून आसपासच्या सर्व वस्तूंना प्रकाशमान बनवितें. कारण त्यायोगें जणुं हिरव्यागार कुरणांतून चाललेली मिरवणूक दिसावी, त्याप्रमाणें आत्म्याला

सर्व जगें दिसतात आणि दोन जागृतींमधील सौंदर्याच्या एका स्वप्नाप्रमाणें त्याला हें जीवन भासतें."

त्या तरुण माणसाच्या मागोमाग एक जख्खड म्हतारा धडपडत व थरथरत आला नि म्हणाला,

"प्रेम ही दुबळ्या व दुःखी शरीराला निःशब्द थडग्यांत मिळणारी शांतता आहे. शाश्वततेच्या कुंपणामध्यें आत्म्याला प्राप्त होणारी ती एक सुरक्षितता आहे."

नंतर एक पांच वर्षांचें मूल आलें आणि तें धांवत धांवत जातांना ओरडून म्हणालें,

"प्रेम ही माझी आई आणि प्रेम हे माझे बाबा आहेत.

आणि माझ्या आईबापांशिवाय इतर कोणालाहि प्रेम म्हणजे काय हें माहीत नाहीं."

आतां दिवस मावळला होता. आणि सगळे लोक देवळासमोरून निघून गेले होते.

त्यांच्यापैकीं प्रत्येकजण प्रेमाविषयीं कांहीं ना कांहीं बोलला होता; व तसें करतांना प्रत्येकानें आपापल्या अंतःकरणांतील इच्छा व अपेक्षा व्यक्त केल्या होत्या आणि जीवनाचीं अज्ञात रहस्यें उकलून दाखविलीं होतीं.

जेव्हां फिरे संध्याकाळ झाली, सगळे लोक आपापल्या रस्त्यांनीं निघून गेले व सगळीकडे स्तब्धता पसरली, तेव्हां मीं देवळांतून येणारा हा आवाज ऐकला :

"जीवन ही एक जोडी आहे.

पैकीं एक गोठलेला प्रवाह आहे आणि दुसरी भडकती ज्वाला आहे.

ही भडकती ज्वाला म्हणजेच प्रेम. ”

आतां मीं देखील मंदिरांत प्रवेश केला, नम्रपणें खालीं वांकून गुडघे टेकले आणि अगदीं अंतःकरणापासून प्रार्थना केली कीं,

“ हे परमेश्वरा, तूं मला त्या भडकणाऱ्या ज्वालेचा ग्रास बनव.

हे जगदीशा, तूं मला त्या पवित्र अग्नीचें इंधन बनव.

आमीन. ”

(मे १९१३)



# माती

विशाल वैभव, प्रचुर प्रतिष्ठा व उत्तम भाग्य बरोबर घेऊन मातीच्या पोटीं माती जन्मास येते.

नंतर ही माती मोठ्या दिमाखानें मातीवरून चालते.

माती मातीपासून राजासाठीं महाल,

आणि सर्वसामान्य लोकांसाठीं उंच उंच मनोरे व चांगलीं चांगलीं मंदिरें तयार करते.

ती चमत्कारिक पुराणकथांना जन्म देते,

अत्यंत कडक कडक कायदे बनविते,

आणि फसवे धर्मसिद्धान्त उत्पन्न करते.

हें सर्व घडून आलें म्हणजे माती मातीच्या जंजाळाला कंटाळून—

आपल्या प्राकृतिक प्रकाशाच्या व अंधाराच्या मदतीनें

अंधाऱ्या व भयंकर छाया

नाजुक व कोमल कल्पना

आणि मनोहर व सुंदर स्वप्नें

निर्माण करते.

या सगळ्या धडपडीनें व परिश्रमानें गळून गेल्यामुळें

जेव्हां मातीच्या पापण्या जड होतात,

तेव्हां मातीची झोप थकल्या भागलेल्या मातीला शांतता देते.

आणि सर्वांना आपल्या वस्त्रामध्यें गुंडाळून घेते.

आणि मग मातीला उद्देशून माती असें म्हणते कीं,

" पाहा, मीच गर्भाशय आहें आणि कबरहि मीच आहें.

आणि सदा सर्वकाळ मीच गर्भाशय राहणार आहें व मीच कबर...

सदा सर्वकाळ.

जोंपर्यंत तारे नामशेष होत नाहींत आणि चंद्र-सूर्य जळून खाक होत नाहींत तोंपर्यंत...... "



# मानवाचें गाणें

आणि तुम्ही मढीं होतां
नंतर तुम्हांला जिवंत केलें,
पुन्हां तुम्हांला मारून टाकील
पुन्हां तुम्हांला जिवंत करील
आणि मग त्याच्याकडेच तुम्हांला परत धाडण्यांत येईल.

—पवित्र कुराण

मी अनादिकाळापासून होतों
आणि आजहि आहें.
आणि अनंतकाळपर्यंत राहीन.
माझ्या काळांना अंत नाहीं.

मी दिग्विहीन वातावरणांत तरंगलों, कल्पनेच्या दुनियेंत उडालों आणि अत्युच्च तेजाच्या वर्तुळाजवळ जाऊन पोहोंचलों. परंतु मी अजून जडद्रव्याच्या कैदेंत आहें.

मीं कन्फ्यूशसच्या शिकवणी ऐकल्या.
ब्रह्माचें ज्ञानहि ऐकलें.
ज्ञानवृक्षाखालीं बुद्धाशेजारीं बसलों.
परंतु अद्यापीहि अज्ञान व जडत्व यांच्यावर विजय

मिळविण्याच्या खटपटींतच आहें. जेव्हां मूसा–( मोझेस ) ला तेजाचें दर्शन घडलें तेव्हां मी त्या तूर पर्वतावर होतों. आणि जेव्हां मीं येशू ख्रिस्ताचे चमत्कार पाहिले तेव्हां मी अरवन पर्वताच्या दऱ्यांत होतों.

मीं मदिनेमध्यें मुहम्मद पैगम्बराचीं प्रवचनें ऐकलीं. परंतु मी अजून आश्चर्याच्या चक्रव्यूहांतच घुटमळत आहें.

मीं बाबिलोनियाच्या सामर्थ्याचें निरीक्षण केलें, ईजिप्तचें ऐश्वर्य पाहिलें, ग्रीसच्या मोठेपणाची पाहणी केली;

परंतु मला त्या सर्वांमध्यें दुबळेपणा, अपमान आणि अप्रतिष्ठाच दिसली.

मी ‘ दूर ’ नांवाच्या झऱ्यावरील जादुगाराजवळ बसलों, बेनेइस्त्राईलच्या देवदूतांजवळ राहिलों आणि पॅलेस्टाइनमधील पैगंबरांचा सत्संग मला लाभला; परंतु मी सत्याचें गीत ऐकूं शकलों नाहीं.

ज्या ज्ञानाच्या गोष्टी फक्त हिंदुस्थानांतच अवतरल्या होत्या त्या मीं तोंडपाठ केल्या.

अरबस्तानमधील रहिवाश्यांच्या अंतःकरणांतून स्फुरलेलीं काव्यें मीं घोकलीं.

आणि पश्चात्यांचें मूर्तिमंत संगीत ऐकलें.

परंतु मी नेहमीं आंधळाच राहिलों. मी कांहींहि पाहूं शकलों नाहीं.

मी बहिराच राहिलों. मी कांहींहि ऐकूं शकलों नाहीं.

मीं अधाशी विजेत्यांची निष्ठुरता सहन केली. आणि जुलमी अधिकाऱ्यांच्या अत्याचारांना बळी पडलों.

मी बलवान बंडखोरांच्या गुलामींतहि राहिलों.

पण कसेबसे दिवस ढकलण्याइतपतच शक्ति माझ्यामध्यें होती.

मी लहान होतों तेव्हां मीं सर्व कांहीं पाहिलें, सर्व कांहीं ऐकलें.

तारुण्य व त्याच्याबरोबर येणाऱ्या गोष्टी मी आतां लवकरच पाहीन, ऐकेन आणि लवकरच म्हातारा होईन व पूर्णावस्थेस पोहोंचेन. आणि मग पुनः परमेश्वराकडे परत जाईन.

मी—

मी अनादिकालापासून होतों.

आणि आजहि आहें.

आणि अनंतकाळपर्यंत राहीन.

माझ्या काळांना अंत नाहीं.

